मराठवाडा साहित्य परिषद् प्रकाशन

# चंद्रहास्य कथा

कवि रामसुतात्मज



संपादक :– डॉ. ना. गो. नांदापूरकर एम्. ए. पीएच्. डी.

संशोधक :– विश्वेश्वर अंबादास कानोले ( नांदेड )



किंमत अडीच रुपये

## प्रकाशकाचें निवेदन —

चंद्रहास्यकथा ही एक अत्यंत लोकप्रिय कथा आहे. या कथेवर कवि रामसुतात्मजानें रचलेलें हें आख्यान तसेंच मनोरम आहे.

मराठवाडा साहित्य परिषदेच्या 'प्रतिष्ठान' या मुखपत्रांत प्रस्तुत आख्यान क्रमश: प्रसिद्ध करण्यांत आलें. तें आज पुस्तक रूपानें प्रसिद्ध होत आहे.

नांदेडचे सुप्रसिद्ध इतिहास संशोधक श्री. वि. अं. कानोले यांनीं या आख्यानाचें संशोधन केलें आहे. आपल्या संग्रहांतील या आख्यानाचीं हस्त. लिखितें आणि कवीच्या चरित्राचें टिपण प्रस्तुत प्रकाशनासाठीं देऊन श्री. वि. अं. कानोले यांनी परिषदेस उपकृत केले आहे.

उस्मानिया विद्यापीठांतील मराठी विभागाचे प्रमुख डॉ. ना. गो नांदापूरकर एम्. ए. पीएच्. डी. यांनीं प्रस्तुत आख्यानाचें संपादन केलें. तसेंच आख्यानाचें मार्मिक रसग्रहणात्मक समालोचनहि केलें आहे. परिषद त्यांची कृतज्ञ आहे

जोशी ब्रदर्स
प्रकाशक व मुद्रक विक्रेते
गोळीगुडा, हैद्राबाद

# संपादकीय -

प्रस्तुत 'चंद्रहास्यकथा' हें काव्य श्री. वि. अ. कानोले यांच्या संग्रहांतील आहे. प्रतिष्ठानमधून–मराठवाडा साहित्य परिषदेच्या मुखपत्रांतून–हें क्रमश: प्रसिद्ध करण्यांत आलें असून आतां पुस्तकरूपानें जनतेच्या पुढें येत आहे. ग्रंथ संपूर्ण प्रकाशित होईपर्यंत त्याची एकच प्रत उपलब्ध असल्या-कारणानें केवळ तिचाच उपयोग करावा लागला. ह्या ग्रंथाचा कर्ता रामसुतात्मज विश्वनाथ असून प्रस्तुत प्रतीचा लेखक शिवानंदानुचर शंकरसुत शिवदास आहे आणि प्रतलेखनाचा काळ शके १६६४ आहे.

संहिता निर्माण करीत असतां मी पुढील मार्ग स्वीकारला. कवीचें मनोगत स्पष्ट व्हावें, त्याचें काव्यवैभव व्यक्त व्हावें, तत्कालीन लेखन-पद्धतीचें वैशिष्ट्य अबाधित रहावें पण त्यासमवेतच ग्रंथांत अशुद्धता राहूं नये आणि वाचकांना सहज रसप्रतीति व्हावी यास्तव मी वृत्तबद्धतेकडे विशेष लक्ष दिलें. कवीची रचना विविध वृत्तांत आहे. वृत्तें नीट वाचतां आलीं. तरच तीं गोड वाटतात आणि अर्थहि प्रतीत होत जातो. यास्तव वृत्तांच्या नियमानुसार भाषेंतील ऱ्हस्वदीर्घ मी नीट केले आहेत. वृत्तसुखार्थ कवीनें अनेक शब्दांची रूपें विकृत केलीं आहेत तीं मला तशींच ठेवावीं लागलीं इतकेंच नव्हे तर कवीनें योजिलेल्या शब्दांच्या शुद्ध रूपांतहि कधीं कधीं मला ढवळाढवळ करावी लागली तसे ऱ्हस्वदीर्घाचे फेरफार मी केले आहेत. पण असा प्रकार अल्प आहे कांहीं शब्दांची शुद्ध रूपें वृत्तांत गुण्या गोविंदानें नांदतातहि, पण प्रतलेखकाने प्रमादानें वा अज्ञानानें त्यांचें अशुद्ध–लेखन केलें. त्यांचीं शुद्ध रूपें मी स्वत: तेथें योजिलीं. अशांचीच संख्या अधिक आहे. हा केवळ एका व्यक्तीचा शुद्धलेखनाचा दोष आहे. यास्तव टीपेंत तीं अशुद्ध-रूपें दर्शवून मी जागा अडविली नाहीं. पूर्वीच्या मौखिक विद्येच्या काळांत

या विद्वानांना लेखनाची संवय नसे; आणि त्यासमवेतच उच्चार करण्यांतील अस्ताव्यस्तपणाहि भरपूर होता. यास्तव पुढील रूपें सार्वत्रिक लिहिलीं जात उ. आचाट, भिती, घेउन, जिर्न, चुर्न, भुपाळ, भुमी इ. इ. तळटीपांत जर हीं रूपें देत बसलों तर दुसराच ग्रंथ छापावा लागेल. यास्तव 'रामार्पने सखे तुम्ही प्रतीपाळ किजे' ह्या कवीच्या विनंतीकडे लक्ष देऊन दोषांकडे दुर्लक्ष केलें, नि शुद्ध रूपांचाच प्रतिपाळ केला आहे. पण याउलट आजच्या लेखनपद्धतीस असंमत असलेलीं, पण कविकालीन वैशिष्ट्यें दर्शविणारीं कांहीं रूपें आहेत. तीं लेखकानें लिहिलेल्या स्वरूपांतच मी स्वीकारिलीं आहेत, येक, यक, क्रुपाळू इ. आणि कांहीं तळटीपांत दिलीं आहेत. पदविग्रह करून, पाठ ठरवून, संहिता निश्चित करीत असतां जेथें अर्थ-दृष्टचा भेद उत्पन्न होतो असें वाटलें तेथें लेखकाचे पाठ शुद्ध असोत वा अशुद्ध असोत तळटीपेंत दिले आहेत. कवीनें अनेक वृत्तांत रचना केली असून कांहींचीं नांवें दिलीं आहेत. तीं मी दिलीं आहेत. जेथें कवीनें वेगळींच नांवें दिलीं आहेत तीं मी तळटीपेंत दिलीं आहेत.

प्रतिष्ठानांतून क्रमश: सबंध ग्रंथ छापल्यावर श्री. कानोले यांचेकडून दुसरी पोथी मिळाली. तिचाहि शेवटीं अर्थनिर्णायक टीपा देतांना मी उपयोग केला आहे. ही दुसरी पोथी पहिलीपेक्षां अशुद्ध आहे. पण पहिल्या पोथींत कांहीं श्लोक अर्धवट आहेत, कांहींचे पाठ नीट लागत नाहींत. ह्या पोथीच्या साह्यानें कांहीं श्लोक पूर्ण होतात आणि कांहीं पाठांचा उकल होतो. यास्तव ग्रंथाच्या शेवटीं अर्थ विवरण करणाऱ्या टीपा देत असतां मी ह्या प्रतीचा उपयोग केला आहे.

**–डॉ. ना. गो. नांदापूरकर**

# चंद्रहास्य–कथा

## प्रस्तावना

मराठी काव्याचा उगम भारत-भागवतादि पुराणांतून झालेला असून प्रथमच्या सर्वच कवींनीं पुराणांतील तत्त्वज्ञान, भक्ति आणि कथा आपल्या विशिष्ट दृष्टिकोणांतून स्वतःच्या अनुभूतीसमवेत जनतेस सांगितल्या आहेत. पुराणांतील अत्यंत लोकप्रिय आख्यानें आणि रोमहर्षक प्रसंग यांची निवड करून मराठी कवींनीं आपलें काव्य सजविलें आहे. नळ, हरिश्चंद्र, राम, कृष्ण, पांडव यांच्या अनेक कथा अनेकांनीं गायिल्या आहेत. यांतील कांहीं कथा इतक्या प्रभावी आहेत कीं त्यांनीं फार प्राचीन काळींच साता समुद्रांचें उल्लंघन करून जगभर प्रवास केला आहे. त्यांतच चंद्रहास्याची कथा आहे "जगांतील इतर भाषांच्या वाङ्मयांतहि हिनें अढळ स्थान प्राप्त करून घेतलें आहे इ. स. २८० च्या जवळपास ह्या कथेचें रूपांतर थोड्या फार फेरफारांनी झालें आहे. जैन–वाङ्मयांतहि ही कथा आलीशी दिसते. लॅटिन, फरेंच, जर्मन आणि इंग्लिश ह्या युरोपीय भाषांतहि हिचीं भाषांतरें झालीं आहेत. ह्या भाषांतररूपानेंच ती शेक्स्पियरच्या हॅम्लेट नाटकास प्रेरणा-देती झाली आहे." असें डॉ. केतकर त्या कथेविषयीं प्राचीन महाराष्ट्र शातवाहनपर्वांत पृ. २५६, २५७ सांगतात.

चंद्रहास्याची कथा हृदयंगम आहे हें खरें, ती अनेक देशीभाषांत गेली हेंहि खरें; पण चमत्कार असा कीं मराठींत हिच्यावर फारच विरळ रचना झाली आहे. तंजावर येथील सरस्वती–महाल–संग्रहांत नामापाठक, रंगकृष्ण आणि प्रतापराम या कवींनीं लिहिलेल्या चंद्रहास्य–कथांचा उल्लेख आहे.

त्याचप्रमाणें चांदोरकरांच्या संत-कवि-काव्य-सूचींतहि काय जो उल्लेख असेल तोच. पण मुद्रित ग्रंथरूपानें मात्र अद्याप ती कोठेंच उपलब्ध नाहीं. त्या दृष्टीनें पाहतां रामसुतात्मज कवीचा हा प्रयत्न अगदीं पहिलाच आहे. नाहीं म्हणावयास याच्या पूर्वी झालेल्या श्रीधरानें आपल्या जैमिनी अश्वमेधावरील रचनेंत ही कथा दहा अध्यायांत सांगितली आहे; पण ती एका ग्रंथाचा भाग म्हणून आहे. स्वतंत्र ग्रंथरूपानें मुद्रित होणारी रामसुतात्मजाची रचना हीच पहिली आहे.

रामसुतात्मज म्हणतो, आपण ही कथा भारतांतून घेतली आहे..
" गिरा वदे रामसुतात्मजाची । कथा बरी सुंदर भारतीची ॥ १ । ६
" कथासार साहित्य हे भारतींची । असे तुंबली श्लोकगंगा गुणाची ॥
" जयामाजि हे कीर्ति गोविंदजीची । वदे वैखरी रामसूतात्मजाची ॥ ३ । ८०
" हयमेधकथा रमणीय निधी । भरला भिम अर्थनिरें उदधी
" यदुराजचरित्र-कथा-लहरी । कवि रामसुतात्मज ग्रंथ करी ॥ ६ । ८७
" मनोरम्य रंजे कथा भारतीची । महाज्ञान-वैराग्य-गंगा गुणाची
" जयामाजि हे कीर्ति दामोदराची । वदे भारती रामसूतात्मजाची ॥ १० । ८४
" कथा भारतीची मनोरम्य वाणी । असे भक्तिभावार्थ आनंदखाणी
" जनें चिंतिला देव सारंगपाणी । असे तो कवी विश्वनाथाभिमानी॥ १०।८६

असे त्याचे अनेक स्थळीं उल्लेख आहेत. यावरून ही कथा व्यासांच्या भारतांत आहे कीं काय अशी शंका येते. कथेंतील आशयावरून पाहतां हिचें संभवनीय स्थान व्यासभारतांतील अश्वमेधपर्वात ठरतें. पण तेथें ही कथा नाहीं. व्यासांच्या आश्वमेधिक पर्वांत ८२ व्या अध्यायापर्यंत यज्ञीय अश्व उत्तर, पूर्व इ. दिशांतून फिरला आणि अर्जुनानें त्याजसमागमें राहून अनेक राजांना जिंकून त्यांजपासून तो विमुक्तहि केला अशा कथा आहेत. ८३ व्या अध्यायांत तो अश्व दक्षिणेकडील निषाद, द्रावीड, आंध्र, रौद्र, महिषक, गोकर्ण, कोल्लगिरि इ. प्रांतांतून भ्रमण करीत पुढें सौराष्ट्रांत गेला असा उल्लेख आहे. व्यास-भारतांत दक्षिणेसंबंधीं ह्या विषयापुरता एवढाच उल्लेख आहे. यावरून राम-

सुतात्मजानें ही कथा तेथून घेतली नाहीं; कारण ती मुळांत तेथें नाहींच. व्यासांच्या प्रमाणेंच व्यासशिष्य जैमिनी ह्यानेंहि सबंध भारत रचिलें होतें असें म्हणतात. पण व्यासांचा उपमर्द होऊं नये ह्यास्तव त्याचा सबंध ग्रंथ बुडविण्यांत आला; परंतु त्याच्या प्रार्थनेवरून अश्वमेधपर्व तेवढें संरक्षिलें गेलें. एवढेंच नव्हे तर व्यासांच्या अश्वमेधपर्वापेक्षां तें लोकप्रिय होईल असा जैमिनीस आशीर्वाद मिळाला अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे. तेव्हांपासून व्यासाचें सबंध भारत आणि जैमिनीचें अश्वमेधपर्व हे उभय ग्रंथ प्रसिद्ध आहेत. पण पांडवांच्या इतर सर्व कथा ज्या प्रसिद्ध आहेत त्या व्यासांच्या भारतांतील असून अश्वमेधासंबंधी ज्या कथा सांगण्या-ऐकण्यांत येतात त्या मात्र जैमिनीच्या आश्वमेधपर्वांतील आहेत. व्यासांच्या आश्वमेधिक पर्वापेक्षां जैमिनीय अश्वमेध ग्रंथ फार लोकप्रिय आहे. यास्तव रामसुतात्मज कवि जेथें जेथें "भारती कथा" म्हणतो तेथें तेथें महाभारत न समजतां जैमिनीचा ग्रंथ असा अर्थ आहे. यावरून हें सरळच आहे कीं रामसुतात्मजानें ही कथा जैमिनीच्या अश्वमेधपर्वावरून घेतली असावी.

जैमिनीच्या अश्वमेधांतील कथा पुढीलप्रमाणे आहे. धर्माचा यज्ञीय अश्व आणि अर्जुनानें मार्गांत दुसऱ्या राजाचा जिंकलेला यज्ञीय अश्व असे दोन्ही भ्रमण करीत करीत सारस्वतपुराहून कुंतलपुरास पातले. तेथें ते चंद्रहासाच्या पुत्रांनीं धरून स्वनगरास नेले. अश्व अदृश्य झालेले पाहून अर्जुनादिकांस चिंता लागली. तों नारद ऋषि तेथें आले. अर्जुनानें त्यांस अश्वांसंबधी पृच्छा केली. नारद म्हणाले, वारु चंद्रहासाने नेले. आतां ते परत मिळणें अशक्य आहे. त्यावर अर्जुन चंद्रहासाचे चरित्र विचारतो आणि नारद सांगतात.

नारद म्हणतात, चंद्रहास हा केरळाधिपति सुधार्मिक राजाचा पुत्र. तो मूळ नक्षत्रावर जन्मला, यास्तव राजावर संकट ओढवलें. शत्रूंनीं सुधार्मिक राजावर आक्रमण केलें. त्या युद्धांत राजा वधिला गेला. त्याची पत्नी त्याजसह सती गेली. धात्री तीन वर्षांच्या चंद्रहासास घेऊन कुंतलपुरास आली. तिनें कांहीं काळ त्या बालकाचें संगोपन केलें. तिच्या निधनानंतर नगरस्त्रियांनीं चंद्रहासाचा प्रतिपाळ केला.

एके दिवशीं कुंतलाधीशाचा मंत्री धृष्टबुद्धि ह्याचे गृही कांहीं समाराधना होती. चंद्रहास सहजच मुलांसमवेत खेळत खेळत तेथें पातला. विप्रांनीं आणि ऋषींनीं भोजनानंतर त्या मुलाचीं सुलक्षणें पाहून त्याजवरच मंत्राक्षता टाकिल्या, धृष्टबुद्धि म्हणाला, तुम्ही अविचारानें भलत्याच मुलावर अक्षता टाकल्या. ऋषि म्हणाले, हा सुलक्षणी असून तुझ्या धनाचा प्रतिपाळक होणार आहे आणि राजा होणार आहे. विप्रवाक्य परिसून धृष्टबुद्धीस चुटपूट लागली. तो तें असत्य ठरविण्याच्या उद्योगास लागला. त्यानें चांडाळांकरवीं त्यास वधण्याचा घाट घातला. चांडाळांनी त्यास वनांत नेलें. चंद्रहास बालपणापासूनच विष्णुभक्त होता. त्यास लहानपणीं एक शालिग्रामशिला सांपडली होती. तो अत्यंत भक्तिभावानें तिची पूजा करीत असे. ती शिला तो सतत स्वमुखांत ठेवीत असे. चांडाळ आपणांस वधणार हें पाहून चंद्रहास्यानें परमेश्वराचा धांवा केला. त्यायोगें चांडाळांचें हृदयपरिवर्तन झालें. त्यांना दया आली. त्यांनीं त्याच्या पायाचें सहावें बोट कापून त्यास जिवंत सोडून दिलें. चांडाळांनीं बोटाची खूण धृष्टबुद्धीस दाखविली. धृष्टबुद्धीचें समाधान झालें. त्यानें चांडाळांस द्रव्य दिलें.

इकडे त्याच अरण्यांत कुलिंद देशाचा राजा मृगयेस आला असतां त्यास हें बालक दिसलें. त्यानें त्यास स्वनगरास नेलें. त्यास पुत्र नसल्यामुळें त्यानें त्याचें अपत्यवत् लालन पालन केलें. राजानें त्याची मौंज करून त्यास विद्या शिकविली. सोळावे वर्षीं चंद्रहास पित्राज्ञा घेऊन दिग्विजयास निघाला. अनेक नृपांना जिंकून विपुल द्रव्य घेऊन तो स्वदेशीं परत आला. पिता म्हणाला, धृष्टबुद्धि माझा स्वामी आहे. त्यानेंच मला हें शतग्रामांचें राज्य दिलें आहे. त्यास आणि कुंतलाधीशास ह्यांतील द्रव्य दे. तदनुसार कुलिंदाधिपानें आपल्या मंत्र्यासह कुतलाधिपाकडे आणि धृष्टबुद्धीकडे द्रव्य धाडलें. तेथें त्यानें राजास, प्रधानास आणि राजपुरोहितास त्यांचा त्यांचा भाग दिला. धृष्टबुद्धीनें कुलिंदाकडील ह्या सर्व मंडळीस भोजनास पाचारिलें. पण आज हरिदिनी आहे, आमचा स्वामी चंद्रहास याची एकादशी करण्याची आम्हांस आज्ञा असल्यामुळें आम्ही आज भोजन करणार नाहींत, असें कुलिंदमंत्र्यानें धृष्टबुद्धीस सांगितलें. धृष्टबुद्धि मनांत रागावला आणि त्यानें

त्यांस दुसरे दिवशीं भोजनास घातलें. राजाज्ञा घेऊन धृष्टबुद्धि कुलिंदराज्य पाहण्यासाठीं निघाला.

धृष्टबुद्धि कुलिंदाधिपाच्या चंदनावतीस जाण्यास निघाला असतां त्याच्या कन्येनें– विषयेनें कूट भाषण करून आपल्या यौवनावस्थेची त्यास जाणीव करून दिली. मंत्री आलेला पाहून कुलिंदाधिप आणि चंद्रहास यांनीं त्याचें स्वागत केलें. चंद्रहासास पाहून हा कोण म्हणून धृष्टबुद्धीनें नृपास विचारिलें. नृपानें त्याची सर्व कथा कथिली. धृष्टबुद्धीनें त्यास ओळखलें. त्यानें त्यास वधून विप्रवचन असत्य करण्याचा पुनश्च प्रयत्न केला. त्यानें आपल्या पुत्रास मदनास पत्र लिहून चंद्रहासास विष देऊन वधण्याची सूचना दिली. तें पत्र गुप्तपणें आपल्या पुत्रास नेऊन देण्याचें कार्य चंद्रहासास सांगि-तलें. चंद्रहास चार सेवकांसह निघाला. कुंतलपुराजवळील उपवनांत उतरून त्यानें स्नानसंध्या सारिली आणि तो भोजन करून तेथें विश्रांति घेऊं लागला.

इकडे कुंतलपुरच्या राजाची कन्या चंपकमालिनी आणि धृष्टबुद्धीची कन्या विषया ह्या दोघी आपल्या १०० दासींसह त्याच उपवनांत क्रीडा करण्यास आल्या. त्यांनीं तेथें मनसोक्त क्रीडा केली. क्रीडेनंतर विषयेनें चंद्रहासास पाहिलें. त्यानें तिचें मन मोहिलें क्रीडा करून मैत्रिणी नगरास परत जात असता विषया त्यांना चुकवून मागें राहिली. ती सुप्त चंद्र-हासाकडे आली. तों तिला त्याच्या कंचुकांतून-कपचांतून–आंगरख्यांतून बाहेर पडलेलें पत्र दिसलें. तिने तें वाचलें. हें पत्र आणणारास विष दे, असें पित्यानें मदनास लिहिलेलें वाचून तिला विस्मय वाटला. आपल्या पित्यानें आपल्या सूचनेप्रमाणें वर पाठविला असून पत्र लिहितांना मात्र हस्तदोष झाला आहे; पण तो तसाच राहूं दिला तर मदन ह्या राजबिंड्यास खचितच विष देईल. ह्यास्तव तिनें ती चूक नीट केली. तिनें आपल्या अंगुलीनें आम्रवृक्षाचा चीक घेतला आणि "विषमस्मै प्रदातव्यम्" ह्या ठिकाणीं "विषयास्मै प्रदातव्याम्" अशी रचना केली. नंतर तिनें पत्रावर पूर्ववत् आम्रवृक्षाच्या चिकाची मुद्रा केली नि तें त्याच्या कंचुकांत पुनश्च ठेवून दिलें. एवढें करून विषया स्वमंदिरास प्राप्त झाली.

चंद्रहास जागा झाला, कुंतलपुरांत प्रविष्टला आणि मदनास भेटला. त्यानें मदनास धृष्टबुद्धीचें पत्र दिलें. मदनानें त्याचा सत्कार केला; पत्र वाचलें आणि त्यास विषया देण्याची सिध्दता केली. सुमुहूर्त पाहून मदनानें चंद्रहास्य आणि विषया यांचा विवाह मोठ्या थाटामाटाने केला; आणि त्यांत फार दानधर्म केला

चंद्रहास गेल्यानंतर चंदनावतींत धृष्टबुद्धीनें कुलिदनृपास बंदींत टाकलें आणि प्रजेस बहुत प्रकारें छळून तो कुंतलपुरास परतला. मार्गांत त्यास एक भुजंग भेटला. तो म्हणाला, मी आजपर्यंत तुझें धन रक्षिलें पण तुझ्या पुत्रानें मदनानें माझें स्थान नष्ट केलें यास्तव मी आतां जातो. धृष्टबुद्धीस त्याचा अर्थ कळाला नाहीं यास्तव तो घाईनें कुंतलपुरास पातला नगरांत त्यास विप्र-बंदीजनाकडून चंद्रहास-विषयेच्या विवाहाचें वृत्त कळालें. त्यानें मंदिरास येऊन मदनास विचारलें. आपल्या आज्ञेप्रमाणेंच मी वागलों, असें सांगून मदनानें त्यास पत्र दाखविलें. पत्र पाहून धृष्टबुद्धीनें दैवास दोष लावला. त्यानें चवथ्या दिवसाचें चतुर्थीकर्म (साड) सपविलें. पण चंद्र-हास्साचा नाश कसा करावा याचा विचार त्याच्या मनांत चालूच होता. तो चंद्रहासास म्हणाला, आमच्या कुळांत चंडिकापूजन विवाहानंतर आवश्यक असतें. तुझा आज विवाह झाला आहे. यास्तव तू एकटाच जाऊन संध्या-समयीं चंडिकापूजन करून ये. इकडे चंद्रहासास असें सांगितलें आणि तिकडे चंडिकेच्या मंदिरांत चांडाळांची स्थापना करून त्यांस आज्ञापिलें कीं निशासमयीं जो कोणी पूजनास येईल त्यास तुम्ही निःशंक वधा. अशा प्रकारें त्यानें पुन्हा चंद्रहासाचा वध करण्याचें ठरविलें.

कुंतल देशाच्या राजास वैराग्याचे विचार येऊं लागले. त्यानें आपला पुरोहित गालव ह्यास बोलाविलें आणि अरिष्टाध्याय ऐकण्याची इच्छा केली. गालवानें त्यास अरिष्टाध्याय सांगितला. तो ऐकून विरक्त झालेला राजा समीप बसलेल्या मदनाच्या कानांत म्हणाला, "मदना, तूं आपल्या जांवयास आण, मी आपलें हित करून घेईन." राजाज्ञेनुसार मदन निघाला. चंद्रहास देवीच्या पूजनास जात असतां मार्गांत त्यास मदनानें राजाची आज्ञा कळ-

वून राजाकडे धाडलें आणि स्वत: त्याजजवळील पूजासाहित्य घेऊन तो अंबिकापूजनास गेला. चंद्रहास राजास भेटला. राजानें चंपकमालिनी आणि आपलें राज्य त्यास अर्पिलें. राजा राज्यत्याग करून वनास गेला. गालवानें गांधर्वविधीनें चंद्रहासाचा चंपकमालिनीशीं विवाह लावला आणि चंद्रहासास सिंहासनावर बसविलें. तिकडे चांडाळांनीं अंबिकापूजनास गेलेल्या मदनास मंदिरांत प्रवेश करतांच वधिलें. राज्यपदारूढ चंद्रहास चंपकमालिनीस घेऊन धृष्टबुद्धीस नमस्कार करण्यास आला. चंद्रहासास पाहतांच धृष्टबुद्धीस नवल वाटलें. तो चंद्रहासास म्हणाला, तू चंडिकापूजनास गेला नाहींस, आमची कुलमर्यादा कां मोडलीस? चंद्रहासानें घडलेला वृत्तान्त निवेदन केला. आपला पुत्र मदन अंबालयांत गेला हें परिसतांच धृष्टबुद्धि व्याकुळ होऊन विलाप करीतच अंबालयाकडे धांवला. तेथें मदनाचें तें छिन्नविच्छिन्न शरीर पाहून धृष्टबुध्दीनें आपला प्राण त्यागिला.

दुसरे दिवशीं एक तापस ब्रह्मचारी देवीच्या पूजनास गेला असतां त्यास तीं प्रेतें दिसलीं. त्यानें नूतन नृपास– चंद्रहासास तें वृत्त कथिलें. चंद्रहास दु:खित झाला. त्यानें देवीची आराधना केली. तो आत्मबलिदान करीत असतां देवी त्यास प्रसन्न झाली. तिनें प्रधान–पितापुत्रांस सजीव केलें. सर्वांस आनंद झाला.

इकडे चंदनावतींत चंद्रहासाचे आईबाप दुःखानें अग्निप्रवेश करीत होते. तेव्हां धृष्टबुद्धीनें त्यांचें निवारण केलें होतें. त्यांनीं चंद्रहासाच्या ह्या सर्व गोष्टी ऐकिल्या. चंद्रहासानें आपल्या मातापितरांस कुंतलपुरास आणविलें. पुढें विषयेस मकरध्वज आणि चंपकमालिनीस पद्माक्ष पुत्र झाला. अशा प्रकारें शालिग्रामाच्या पूजनानें चंद्रहासाचें कल्याण झालें. एवढें कथन करून नारद अंतर्धान पावले.

पद्माक्ष आणि मकरध्वज यांनीं अश्व धरलेले पाहून चंद्रहास्यास आनंद झाला कीं आतां ह्यांच्या निमित्तानें तरी श्रीकृष्णांचें दर्शन होईल. राजा युद्धासाठीं सैन्य घेऊन आला. अर्जुनहि सिद्ध होताच. पार्थरथावर श्रीकृष्णांस पाहून चंद्रहास त्यांच्या दर्शनास आला. श्रीकृष्णाज्ञेवरून अर्जुनहि त्यास

भेटला. तोंच विषयेचा पुत्र अश्व घेऊन आला. ते अर्जुनास दिले. सर्व लोक कुंतलपुरांत गेले. तेथें मोठा आनंदोत्सव झाला. कृष्णार्जुन तीन दिवस तेथें राहिले. चंद्रहास मकरध्वजास, राज्य देऊन श्रीकृष्णार्जुनांसह निघाला.

वर दर्शविल्याप्रमाणें जैमिनीच्या अश्वमेधांतील कथानक आहे. संस्कृतांतील पुराणांची मराठी जनतेस जी ओळख झाली ती आमच्या मराठी कवींच्या कडून आणि हरिदास–पुराणिकांकडून झाली. हरिदासांनीं आपल्या कीर्तनांतून अनेक कथांचा परामर्श घेतला आणि पुराणिकांनींहि त्या त्या पुराणापुरत्या सांगितल्या. पण संतकवींनीं आणि पंडिती कवींनीं मात्र त्या कथांना मराठींत नेहमींकरितांच आणून बसविलें.संस्कृत पुराणांतील बहुतेक सर्व कथा त्या त्या पुराणांचा अनुवाद करून आणण्यांत श्रीधर फार महत्त्वाचा आहे. विशेषत: रामायण–महाभारतावर त्यानें आपलें लक्ष केंद्रित केलें होतें. त्याचे प्रमुख ग्रंथ रामविजय, हरिविजय, पांडवप्रताप आणि जैमिनी अश्वमेध हेच होते. (शिवलीलामृत शिवासंबंधीं आहे.) श्रीधराची रचना मराठी जनतेंत फार आवडती आहे. आपल्या रसाळ वाणीनें, मनोरम कल्पनाविलासानें, कालोचित उपदेशपर रचना करण्यानें आणि प्रसंग निवडून त्यांची कलात्मक मांडणी कौशल्यानें करण्याच्या गुणानें श्रीधरानें जनमनावर आपला पगडा बसविला आहे. श्रीधर हा रामसुतात्मजाचा समकालीन पण त्याजपेक्षां वडील होता. श्रीधराचा जैमिनी अश्वमेध ग्रंथ शके १६३७ मध्यें पाथरी येथें पूर्ण झाला. प्रस्तुत रामसुतात्मज कवीहि पाथरी–परभणीच्या परिसरांतीलच आहे. तेव्हां साहजिकच श्रीधराचा ग्रंथ निर्माण होतांच ह्याच्या अवलोकनांत आला असावा. इतकेंच नव्हें तर ग्रंथ–रचनेस ह्यास श्रीधरापासूनच स्फूर्ति मिळाली असण्याचाहि संभव आहे. तें कसेंहि असलें तरी जैमिनीच्या रचनेपेक्षां श्रीधराच्या रचनेचा रामसुतात्मजावर अधिक परिणाम झाला आहे. हें पुढें दर्शविलेल्या साम्यस्थळांवरून कळून येणारें आहे. पण असें जरी असलें तरी कवि ह्या नात्यानें रामसुतात्मजानें आपलें स्वतंत्र अस्तित्वहि प्रगट केलें आहे.

जैमिनीनें ही कथा ५०–५९ अशा दहा अध्यायांत ६७३ श्लोकांत वर्णिली आहे. ती श्रीधरानें ५१–६० अशा दहा अध्यायांत १०२२ ओंव्यांत

सांगितली. रामसुतात्मजानें ही रचना दहा प्रसंगांत ७५२ श्लोकांत केली. बरबर पाहतां तिघांचीहि कथा सारखीच आहे. पण जैमिनी आणि श्रीधर यांत फारच साम्य असून श्रीधर आणि रामसुतात्मजांतहि बरेंच साम्य आहे. त्याचप्रमाणें रामसुतात्मजांत कांहीं स्थळीं स्वतंत्रहि रचना आहे. श्रीधरानें पुष्कळ ठिकाणीं जैमिनीचा अनुवाद केला असून कथानक जवळ जवळ तसेंच आणि त्याच क्रमानें वर्णिलें आहे. तथापि जैमिनींत नाहींत आणि श्रीधरानें वर्णिल्या आहेत अशाहि कांहीं गोष्टी यांत आहेत. रामसुतांतहि त्याच गोष्टी आढळून येतात. हीं स्थळें पुढें दिलीं आहेत.

कुलिंद राजास चंद्रहास प्राप्त झाल्यानंतर त्याच्या राज्यास आलेली समृद्धि, चंद्रहासाचा विद्याभ्यास, चंद्रहासाचा राज्याभिषेक, अर्जुनाची चंद्रहासाच्या भेटीविषयींची तळमळ इत्यादि प्रसंग जरी जैमिनींत असले तरी रचनेवरून पाहतां रामसुतात्मजानें ते श्रीधरावरून घेतले असावेत असें वाटतें. पण ह्या सर्वांच्या पेक्षां अधिक महत्त्वाची गोष्ट "दुष्टबुद्धि" ह्या नांवाची आणि त्याजमागील भूमिकेची आहे. जैमिनीय अश्वमेधांत प्रधानाचें नांव "धृष्टबुद्धि" असून तो कुलिंदराजाचा स्वामी म्हणून वर्णिला आहे. "अस्मत्स्वामी धृष्टबुद्धिर्मंत्री कौंतलपस्य सः ॥ शतग्रामक एवायं देशस्तेनार्पितो मम । इतस्तस्यैव नृपतेर्वैरिणो बलवत्तराः ॥ पीडयंति स्म मद्देशं त्वामाकर्ण्योपरेमिरे ॥ ५२।१०,११,१२ तां चदनाऽह्वां परिपालयंतं तं चंद्रहासं जनकः कुलिंदः । उवाच हे पुत्र मया प्रदेयं निष्कायुतं कुंतलपाय राज्ञे । तदर्धमस्मत्प्रभवे प्रदेयं तदर्धमप्यर्धममुष्य पत्न्यै । तत्प्रेषयाशु त्वमुदारसत्त्व प्रीतिं यथा मंत्रिनृपौ लभेतां ॥ इत षड्योजनं वत्स विद्यते कौंतलं पुरं । यस्मिन्कौंतलपो राजा गालवेन पुरोधसा ॥ राज्यं च कुरुते सम्यङमंत्रिणा धृष्टबुद्धिना ॥५२॥ ४८-४९. चंद्रहास दिग्विजयासाठीं निघत असतां कुलिंदाधिप त्यास म्हणतो कीं कौंतलराजाच्या मंत्र्यानें धृष्टबुद्धीनें 'मला शंभर गांवांचें राज्य दिलें आहे. तो आपला स्वामी आहे. त्याचे वैरी आपणांस त्रास देतात. त्याचप्रमाणें जेव्हां चंद्रहास दिग्विजय करून परत येतो तेव्हां राजा म्हणतो, कुंतल देशाच्या राजास अयुत निष्कांचा करभार दे, त्याचा अर्धा आपल्या प्रभूला धृष्टबुद्धीला दे. तो राजा धृष्टबुद्धि मंत्र्यासह चांगल्या

प्रकारें राज्य करीत असतो. ह्यावरून धृष्टबुद्धि मूळचा दुष्ट दिसत नाहीं. पण श्रीधरानें तो **'दुष्टबुद्धि'** केला आणि तसाच रंगविला. श्रीधराची भूमिका जैमिनीइतकी विशुद्ध नाहीं. ह्यानेंच प्रथम जैमिनीशीं विरोध करून तो दुष्ट प्रवृत्तीचा केला आणि पुढील कवींनीं हीच परंपरा पाळिली.

दुसरी गोष्ट चंद्रहासाजवळील पत्रासंबंधींची. जैमिनीची रचना अशी "पतिव्रत् हि विषया दत्तदृष्टिरवैक्षत । ततो ददर्श रुचिरं पत्रं **कंचुकनिःसृतम्** । गृहीत्वा तत्करेणाशु मुद्रामुन्मुच्य विस्मिता ।। वाचयामास तत्पत्र... ।। पितुर्वै पत्रमालोक्य मदनोऽपि हनिष्यति । कनिष्ठिकानखेनाथ तीक्ष्णेनादाय सुन्दरी ।। **रसालद्रुमनिर्यासं** लिलेख विषया तदा । विषयास्मै प्रदातव्येत्येवं वर्णान् समालिखत् ।। पत्रं **रसालनिर्यासकृतमुद्रं** विधाय सा । **कंचुकाभ्यन्तरे** न्यस्य विषयाऽगान्निवेशनम् ।।५४। ७, ८, १५,-१७. जैमिनी म्हणतो, "चंद्रहासाच्या **आंगरख्यांतून** गळालेले पत्र विषयेनें पाहिलें, उचललें आणि वाचलें. पित्याच्या पत्रानुसार मदन त्यास वधील, यास्तव तिनें करंगळीच्या नखानें **आंब्याच्या झाडाचा चीक** काढला आणि त्यानें 'विषया यास दे' असें लिहिलें. त्या पत्रावर तिनें **आंब्याच्या चिकाची मुद्रा** केली नि तें त्याच्या **आंगरख्यांत** परत ठेवलें. एवढें करून विषया स्वगृहास परत गेली." लोकप्रसिद्ध कथा ह्यापेक्षां विभिन्न आहे. हाच कथाभाग श्रीधरानें पुढीलप्रमाणें वर्णिला, "यापरी ते मृगनेत्रा । वारंवार पाहे रमणवक्त्रा । तों अकस्मात् देखिलें **पत्रा** । **वस्त्रपल्लव सुटले** ते ।। ते युक्तीनें घेतलें उचलोन ।... आद्यन्त पत्र वाचों लागली ।। हें पत्र वाचील मदन । तरी विष घेईल याचा प्राण । मग मजही मरण । जाणवेल सहजची ।। थोडकेंचि पडलें अंतर । एके कान्याचा असे फेर । उपेक्षिलिया अनर्थ थोर । होईल ऐसें वाटतें ।।...।। काना देतां सत्वर । शुद्ध होईल लेख समग्र । ऐसें विचारोनि सत्वर । **अंजन काढिलें नेत्रींचें** ।। **काढी नखें नेत्रकाजळ** । माजी मेळविलें निर्मळ जळ । **काना दिधला तात्काळ** । यथार्थ जैसा नोळखे ।। **पुन्हा तैसेंच गुंडाळोन** । **वस्त्र तयाचें घेऊन** । **त्यांत तें दृढ बांधोन** । आपण तेथून चालिली ।। ५५।१६, १७, १८, ३२, ३३, ३७, ३८, ३९. आतां ह्याच विषयासंबंधीं रामसुतात्मजाची रचना पहा.

करी विचार अंतरीं सभाग्य पुण्यदायका
विचित्र **अंबरांचळीं विराजमान पत्रिका**
देखतांचि पातली कलाकल्लोळ व्यापका
**सोडिली** हळूचि ते चरित्र चित्तशोधका ॥५।७०

तटाकातटी नीकटीं हाटकांगी। मृगांकानना पत्र वाची कुरशांगी
सुअर्थी असे अर्थ पत्रांग अंगी। सुरंगी दिसे रंग रंगी सुरंगी ६।५

चतुर वर विचारें धाडिला आजि तानें
सकळ मज कपाळे घात केला निघातें
विपरित लिखितार्थी चूकि या अक्षरातें
मदन मर्दनि आतां वीष देईल यातें. ६।१०

नेत्रांबुजीं अंजन फार होतें। करांबुजें कज्जळ काढिलें तें
ते मंदर मुद्रल आंगुळीते। 'या' मनिध 'या' करि पत्रिकेते ॥१७

पुढे वाचिली वाढि वेगी सतोनें
सुपत्री दिसे वीषया यासि देणे
बरी चर्चिली कुंकुमाने प्रितीनें
त्वरे पालखी बांधिली थोर मानें ॥१८

यावरून दिसतें कीं प्रचलित लोककथा प्रथम श्रीधरानें बनविली. आंब्याच्या चिकानें लिहावयाचें अक्षर त्यानें डोळयांतल्या काजळानें लिहविलें. आणि अंगरख्यांतून घेतलेलें ठेविलेलें पत्र शेल्यांतून घेवविलें ठेवविलें. रामसुतात्मजानें अर्थातच त्याचें अनुकरण केलें आहे. पण रामसुतात्मज श्रीधराच्या पुढें एक पाऊल गेला आहे. श्रीधरानें 'काना' देऊन लेख शुद्ध केला तर आमच्या कवीनें तेथें 'या' हें अक्षरच घातलें.

वसंतवनामध्यें तरुण, सुंदर चंद्रहासास पाहून विषया त्याजवर अनुरक्त होते. तेव्हां तिच्या मनांत त्याजविषयीं जे विचार उत्पन्न होतात ते श्रीधराचे आणि रामसुतात्मजाचे सारखेच आहेत. श्रीधर :—" क्षणक्षणा करी विलोकन। लावण्यरूपीं जडलें मन। तों पीडा पावों लागला मदन। म्हणे काय शयन करूं येथे ॥ भागला मार्गी येतां रमण। म्हणोनि येथें केलें

शयन। भार तरी चरणावर घालोन। ते श्रम परिहरूं कीं ॥ मुखीं उमटले घर्मांबुकण। पुसों यातें पल्लवेंकरून। किंवा घालूं शीतळ पवन। वस्त्रांचळेंकरूनी ॥ ५५।१३-१५.

रामसुतात्मज असें वर्णितो :—

उपाय काय मी करूं। करूं वरासि आदरू
हळूंच पाउलें चुरूं। कसी तनूस आवरूं
वरा अन्न आणू वना भोजनासी। तरी ऊठवूं प्राणनाथासि कैसी
रसाळें फळें ठेवितां संनिधेसी। न भक्षी कदा भूप लावण्यरासी
क्षणभरि रगडू मी पादपद्में वराचीं
अगणित झणि भंगे दीर्घ निद्रा भुपाची
लवकरि लवलाह्ये नीज भंगेल याची
चिटपण निट ठाके लाज तेव्हां जनाची
विराजे बहू खेद याच्या शरीरा
तनू तापली थोर जाला उबारा
हळू काय घालू तऱ्ही मंद वारा
श्रमाचा कसा होय आतां निवारा
त्वरें ऊठवूं प्राणनाथासि आतां
पुसू ना ययाचे मनीं काय चिंता
विचारें वरें चोज वाटेल कांता
वरावी कसी नोवरी धीट कांता ६।२१-२५

श्रीधराच्या आणि ह्या कल्पना सारख्याच आहेत. त्या आमच्या कवीस श्रीधरावरूनच सुचल्या आहेत, मात्र त्यानें त्यांचें स्थान पालटलें आहे. श्रीधरांत पत्र-वाचनापूर्वी हे विचार आहेत. आणि रामसुतात्मजानें ते पत्र-वाचनानंतर दिले आहेत. एवंच श्रीधराच्या कल्पना वाढवून, ठाकठीक करून हा लिहितो असें दिसतें. अर्थात् त्यानें आपलें कथानक पुष्कळसें श्रीधरावरून उचललें आहे.

अशा प्रकारें रामसुतात्मजास जैमिनी आणि श्रीधर यांचेकडून पूर्वसिद्ध कथानक प्राप्त झालें होतें. तथापि ह्यानेंहि त्यांत स्वकौशल्यानें फेरफार

केले आहेत. श्रीधरांतील प्रसंग ह्यानें एक तर मागें पुढें केले आणि दुसरे श्रीधरांत आणि जैमिनींत असलेले भाग वगळून त्या त्या ठिकाणीं आपल्या पदरचे घालून कथानक आकर्षक आणि मनोरंजक केलें. जैमिनी आणि श्रीधर, दोन यज्ञीय अश्व अदृश्य झाल्याचें सांगत असतां रामसुतात्मज एकाच अश्वाचा उल्लेख करतो. ही रचना याची स्वतःची आहे. त्याचप्रमाणें दुष्टबुद्धि कुलिंदनगरास जात असतां राजा त्यास चंपकमालिनीस वर पहा म्हणतो. 'राजा वदे कौंतळमंत्रियातें। पाहा वरू चंपकमालनीतें' ४।१७,१८ हाहि कथाभाग अर्थात् रामसुतात्मजाच्या मनचा आहे. चंद्रहास आणि विषया यांचा विवाह झाल्यावर दुष्टबुद्धि येतो. आपण आलों हें वर्तमान कळविण्यास आणि राजास साड्यास बोलाविण्यास तो मदनास धाडतो. मदन तदनुसार नृपास कळवितो 'प्रभु आजि आहे दिन साडियाचा' ७।३८. त्यानतर राजा विचारतो, विवाह कोणाचा झाला ? सभासद चंद्रहासाचे गुण गातात, त्याचा विषयेशीं विवाह झाल्याचें सांगतात. राजा रागावतो, दुष्टबुद्धीची निर्भर्त्सना करतो, सभासदांच्या मतानें चंद्रहासास चंपक मालिनी देण्याचें ठरवितो आणि मदनास चद्रहास आणण्यास धाडतो. पुढें अंबिकापूजनास चाललेल्या चद्रहासास मार्गांतून मदन राजसदनीं नेतो. येथपर्यंतचा कथाभाग श्रीधर आणि जैमिनी ह्या उभयतांतहि नाहीं. हा जो राजसभेंतील प्रसंग आहे तेथें मुळांत राजाच्या मनांत संसाराचा वीट आल्यामुळें तो गालवास अरिष्टाध्याय विचारतो.'ते सांगतात. राजा आत्महित साधण्यासाठीं वनास जाण्याचा निश्चय करतो. तेव्हां सभेंत बसलेल्या मदनाच्या कानांत तो सांगतो, तू आपल्या जांवयास घेऊन ये म्हणजे मी आपलें हित करून घेईन. मदन चंद्रहासास मार्गांतून आणतो. राजा आपलें राज्य आणि कन्या त्याच्या स्वाधीन करून वनास जातो. गालव चंद्रहासास गादीवर बसवितो आणि चंद्रहास्य-चंपकमालिनीचा गांधर्व–विवाह लावतो. पण आमच्या कवीनें अरिष्टाध्यायाचा भाग वगळून कथानक रगविण्यास अनुकूल फेरफार केले. यास्तवच पुढें आमच्या कवीनें चंद्रहास–चंपकमालिनीच्या विवाहाचें जें वर्णन आठव्या प्रसंगांत केलें तें त्याचें स्वतंत्र कथन आहे. त्यास मुळाचा किंवा श्रीधराचा यत्किंचितहि आधार नाहीं. त्याचप्रमाणें चद्रहासाच्या

विनंतीवरून राजा वधूवरांसह दुष्टबुद्धीच्या गृहीं येतो. तेथें भोजनादि प्रसंग, त्यांचा मानपान, राजा, चंद्रहास, विषया, चंपकमालिनी या सर्वांनीं राजवाड्यांत जाणें, तेथें चंद्रहासास राज्याभिषेक इत्यादि नवव्या प्रसंगांतील बहुतेक सर्वच कथाभाग राम्सुतात्मजाच्या पदरचा आहे. हे जे फेरफार आणि अधिकचे प्रसंग आहेत ते आमच्या कवीचें कथनकौशल्य दर्शविण्यास पुरेसे आहेत. कथा कशी सांगावी, ती आकर्षक कोणत्या गुणांनीं करावी, आणि तिच्यांत रसवत्ता कशी आणावी हें त्यास उत्तम प्रकारें अवगत होतें हें दिसतें. ह्या लहानशा कथानकांतील प्रसंगांच्या मांडणीचें कौशल्य सर्वस्वी रामसुतात्मजाचें आहे.

महाकाव्य आणि आख्यानकाव्य ह्या दृष्टीनें विचार केला तर कवीनें ह्यांत दोन्ही पद्धतींचा मुमधुर संगम केला आहे असें दिसतें विशिष्ट तत्त्वज्ञान सांगण्यासाठीं अथवा महापुरुषाचें उद्बोधक चरित्र गाण्यासाठीं साधारणपणें आख्यानांची निर्मिति होत असते. प्रस्तुत कथेंत भक्तिमहिमा, नाममहिमा, एकादशीमाहात्म्य आणि शाळिग्रामपूजा हे विषय आले आहेत. एका मनोरंजक कथानकाच्या आश्रयानें कवीने ह्या गोष्टी प्रतिपादिल्या आहेत. पण त्याची सांगण्याची पद्धति कथानक मनोरंजक करण्याची आहे. कथानकाच्या प्रवाहांत ते ते विषय कारण-परिणामरूप असे त्यानें आणले आहेत. असें करीत असतां त्याला थोडा महाकाव्याचाहि आश्रय करावा लागला आहे, किंवा तो प्रकारहि सहजच या काव्यांत आला आहे म्हटलें तरी चालण्याजोगें आहे. कथेचा नायक धीरगंभीर महापुरुष आहे. यांत अष्टाधिक सर्ग आहेत, विविध वृत्तें आहेत, प्रत्येक प्रसंगाचा शेवटचा श्लोक एकाच वृत्तांतील आहे. पुत्रजन्म, विवाह, युद्ध, सैन्य, दिग्विजय, वनवर्णन, नगरवर्णन, उद्यानक्रीडा, प्रयाण इत्यादिकांचें वर्णन असून शृंगार, वीर, हास्य, अद्भुत, करुण, वत्सल, भयानक आणि भक्ति अशा विविध रसांनीं युक्त आणि शब्दार्थालंकारांनीं नटलेली रचना आहे. एवंच बहिरंग आणि अंतरंग या दोन्ही दृष्टींनीं विचार केला असतां महाकाव्याचीं जवळजवळ सर्व लक्षणें ह्या काव्यांत पहावयास सांपडतात. पण कवीच्या कथा सांगण्याच्या

पद्धतीवरून आणि वरील गोष्टींचा व्याप फारच अल्प असल्याकारणानें त्यास महाकाव्य म्हणण्यापेक्षां आख्यानच म्हणणें उचित दिसतें. यासाठींच वर सांगितलें आहे कीं ह्या दोन्ही पद्धतींचा सुमधुर संगम यांत पाहावयास सांपडतो. कवीनेहि स्वतः आपल्या काव्यास कोठें महाकाव्य म्हटलें नाहीच. तो नेहमींच त्यास 'कथा' असेंच संबोधितो; आणि कथा किंवा आख्यान या दृष्टीनें तें अत्यंत सुंदर साधलें आहे.

रामसुतात्मजानें आपलें काव्य कथा सांगण्याच्या उद्देशानेंच रचिलें आहे. अशा काव्यात वर्णनें आणि संभाषणें ही अवश्यमेव लागतातच. कथनपर काव्यांतील वर्णनें ही कथेच्या गतीस थोडा विसांवा देऊन तिच्या ओघांत पुन्हा नवा वेग उत्पन्न करतात. ती वाचकांची मनें विविध कल्पनाविलासांनीं आकर्षून घटकाभर त्यांना रंजवितात आणि पुढील कथन श्रवणासाठीं उत्सुकता वाढवितात. त्याचप्रमाणें संभाषणांच्या द्वारें कथेंतील बारीक-सारीक गोष्टी आणि अस्पष्ट भावना-कल्पना स्पष्ट होतात आणि विशिष्ट भावना-कल्पना पुष्ट होऊन मनावर ठसतात. व्यक्तिदर्शनाला तर ह्या संभाषणांची फारच आवश्यकता असते. आणि व्यक्तिदर्शनासमवेतच ते कथेंत गति आणि गोडीहि निर्माण करतात. कवीची प्रतिभा जेवढी विशाल असेल, तिची भरारी जितकी उच्च असेल आणि त्याची कलात्मकता जितकी अन्तर्भेदी असेल तितकी आणि त्या मानानें कथानकांतहि रंजकता, प्रौढी आणि गोडी ही निर्माण होतात. रामसुतात्मजाची प्रतिभा फार मोठी, प्रौढ नाहीं. त्याची कल्पकता बहुप्रसवा नाहीं. त्याचा कल्पनाविलास अल्पहि आहे आणि साधाहि आहे. त्यांत चमक अशी फारशी नाहीं. त्याच्या वर्णनांत युद्ध, निसर्ग, सुराज्य, उत्सव, विवाह इत्यादि वर्णनें असून भक्ति, वात्सल्य, शृंगार, क्रोध इत्यादि भावदर्शनेंहि आहेत. त्यानें केलेलें वनाचें आणि उप-वनाचें वर्णन पहा. वनवर्णन तर वनापेक्षां उपवनाचेंच वाटतें. त्यांत भया-नकपणा फारसा नाहींच. उपवनांतहि एखादी भयानकता दाखविणारी कल्पना आहेच. एकूण दोन्हीं जवळ जवळ सारखींच आहेत. त्याचप्रमाणें तीं दीर्घहि नाहींत पण प्रस्तुत काव्याच्या मानानें तीं पुरेशीं आहेत. ह्या

त्याच्या निसर्गवर्णनांत फारसा आकर्षकपणा नसला तरी घटकाभर मन रंजविण्याचा मोहकपणा मात्र आहे. त्यानें केलेलीं सेनेचीं आणि युद्धांचीं वर्णनें पहा. हींहि जवळ जवळ सारखींच आहेत. वनवर्णनें आणि हीं युद्धवर्णनें सांकेतिक आणि ठराविक ठशाचीं आहेत. त्यांत कल्पनाविलासहि फारसा नाहीं आणि भावनानिदर्शनहि नाहीं. पण त्यांत आटोपशीरपणाचा मोठाच गुण आहे. कोठें अधून मधून एखादी बऱ्यापैकीं कल्पना येऊन ती मनाला विरंगुळा देते. ह्यायोगानें तीं वर्णनें सह्य वाटतात आणि क्वचित हृद्यहि वाटतात. नाहीं म्हणावयाला त्यानें केलेलें सुराज्यवर्णन, नगरवर्णन आणि विवाहवर्णन हीं मात्र हृदयंगम झालीं आहेत. विवाहवर्णनें दीर्घ असूनहि कंटाळवाणीं वाटत नाहींत. ह्या वर्णनांत त्याचें लक्ष नादमाधुरीकडे फार आहे. अर्थगांभीर्य आणि नादमाधुर्य ह्यातून तो नादमाधुर्यानेंच आकृष्ट होतो. अर्थगांभीर्यासाठीं जी बुद्धीची प्रौढता पाहिजे ती तितकीशीं त्याजपाशीं दिसत नाहीं. त्याचप्रमाणें वर्णनाच्या विविधतेसाठीं जें सूक्ष्मावलोकन पाहिजे तेंहि त्याजपाशीं नाहीं. पण नादमाधुरी उत्पन्न करण्यासाठीं शब्दांची योजना करण्यांत मात्र हा चतुर आहे. त्याची एकंदर रचनाच नादमधुर आहे.

वर दर्शविल्याप्रमाणें हीं वर्णनें जरी त्यास साधत नसलीं तरी त्याच्या यशाचें मुख्य बीज भावनात्मकता आहे. त्याचा मुख्य भर भावनावर्णनावर आहे. हीं वर्णनें त्यानें बऱ्यापैकीं केलीं आहेत. चंद्रहासाची दाई मरतांना आपल्या मैत्रिणींस चंद्रहासाचा प्रतिपाळ करण्यास सांगते आणि त्याहि तिला आश्वासन देतात, चंद्रहासाचा शोक, चंद्रहासाच्या बाललीलांचें आणि नगरस्त्रियांनीं त्याचें संगोपन केल्याचें वर्णन, चंद्रहास वनांत परमेश्वराचा धांवा करतो तो प्रसंग, वनांतील त्याच्या दुःखद स्थितीचें वर्णन, दुष्टबुद्धीच्या मनांतील द्वेष-क्रोधादि विकार, चंद्रहासाच्या मातापित्याचें वात्सल्य, चंद्रहासास पाहून विषयेच्या मनांतील विचार, मैत्रिणींचा वनविहार आणि परस्परांचीं भाषणें, विषयेशीं त्यांचें भाषण, विषयेची विरहावस्था, कुंतल राजाचे दुष्टबुद्धी-विषयीं उद्‌गार, दोन्ही विवाहांतील थट्टा, विनोद इ. अनेक भावनिदर्शक प्रसंग त्यानें चित्रिले आहेत. यांतच त्यानें अनेक लहान लहान संभाषणेंहि

घातलीं आहेत. हे सर्व प्रसंग सोप्या भाषेंत सहजपणें सांगितले आहेत. यांतील भावना अलंकारादिकांचा फारसा आश्रय न करतां सदरतेनें व्यक्त-विल्या आहेत. प्रसंगानुरोधानें यांत विविध रस प्रकट झाले आहेत. ह्याच्या रसप्रतिपत्तीत एक विशेष गोष्ट आहे. तीन-चार प्रसंगींच ह्याची रसवत्ता उत्कटतेनें प्रगट झाली आहे; पण सर्वत्र मात्र भावसिंचन आहे त्यायोगानें सर्वत्रच प्रसन्नता वाटते.

रामसुतात्मजाची शैली अगदी साधी आणि सरळ आहे. त्याच्या वर्णनांत पाल्हाळ नाहीं, शब्दावडंबर नाहीं आणि अलंकारप्रचुरताहि नाहीं. त्याची वर्णनें अगदीं आटोपती आहेत. अलंकारांत तो रूपक, उपमा, स्वभावोक्ति, अतिशयोक्ति आणि क्वचित उत्प्रेक्षा याच्या पलीकडे फारसा जात नाहीं. पण ह्या अलंकारांचा सयमित उपयोग त्याच्या रचनेंत फार उचलून दिसतो. अर्थालंकार आणि शब्दालंकार यांतून अर्थापेक्षां शब्दालंकाराकडेच त्याचा ओढा अधिक आहे. यमकानुप्रास यांचा मात्र विपुल भरणा आहे. शब्दालंकार हे नादमाधुरी उत्पन्न करीत असतात. नादमधुर रचना करण्याचा जणूं कवीस हव्यास दिसतो. यास्तव त्यानें आवर्जून ह्यांचा उपयोग केला आहे यमकांमध्यें तो आदियमक आणि अन्त्य यमक अशीं दोन्ही वापरतो. पण त्यांत फारसें स्वारस्य नाहीं. ह्याची यमकाची कल्पना फार साधी आहे. यमकासाठीं अर्थभिन्नता अगत्य लागते, हें ह्यानें मानलें नाहीं. ८ व्या प्रसंगांतील २६ व्या श्लोकांत त्याने आदियमकासाठीं 'कळेना कदा' हे शब्द वापरले आणि २७ व्यांत 'कळेना' हा वापरला. पण त्यांत अर्थभिन्नता नाहीं. ६।१४ मधील 'किती', ६।१९-२० मध्यें 'कळेना' ५।३३,३४ मधील 'यकी' आणि ५।३५,३६ मधील 'किती,' ४।५८ मधील 'विसरशी', ४।५१ मधील 'झणी' २।८,९ मधील ' किती,' १।७७ मधील 'जे जे', १।५१,५२,५३ मधील 'रामार्पण', १।४९ मधील 'मजवीण' हीं ह्याचीं आदियमकें होत. अर्थात हीं तितकीं हृद्य वाटत नाहींत. पण ह्या योगानें त्यानें दुसरी गोष्ट साधली आहे. 'एकच कल्पना पुनःपुन्हा जर मर्यादितपणें आवृत्त झाली तर ती गोडी निर्माण करते. अशी पुनरुक्ति भाषाशैलीचा एक गुण आहे. ह्या यमकांच्या योगानें त्यानें

तें कार्य साधलें आहे. ह्यांतील पहिल्या दुसऱ्या प्रसंगांतील पुनरुक्ति निःसंशय मनोरम आहेत. अंत्य यमकांत अर्थभिन्नतेसह स्वराचाहि संबंध आहे. समान वर्णांचे मागील स्वर उभय चरणांत एकच असावा लागतो. 'बैसला रथीं-सारथी' यांतील 'रथी' ह्या दोन वर्णांच्या पूर्वी प्रथम चरणांत 'आ' आहे तसाच द्वितीय चरणांतहि 'आ' स्वर आहे. तेव्हां हें दोन अक्षरी यमक आहे. पण आमच्या कवीनें ही शिष्टमर्यादा फारशी पाळली नाहीं. बहुधा ती मोडलीच. आधीं तर ह्याच्या रचनेंत दीर्घ यमकें-तीन, चार अक्षरांचींहि नाहींतच आणि जीं एक दोन अक्षरी यमके आहेत त्यांतहि हा 'समस्वराभाव' जाणवतो. भूपतीनें-सूर्यपानें, विरुंदी-काचबंदी, निबंदी-सवादी, समेळा-उमाळा, सपाटे-अलोटे, मेळे-भुपाळें, तटाके-अनेके, मेळे-भुपाळें, होणे-देणें, घेणें-होणें इ. यमकें हीं यमकेंच नव्हेत. पण असेंहि जरी असलें तरी बऱ्याच ठिकाणीं सहज कां होत नाहीं पण यमकें आलीं आहेत्. यमकांपेक्षां अनुप्रास मात्र ह्यास चांगला साधतो, अनुप्रासानेंच त्यानें आपली रचना श्रुतिमनोहर केली आहे. लेखनशैलीमध्यें माधुरी आणण्या-साठीं आणि वाचकाच्या मनांत स्निग्धता उत्पन्न करण्यासाठीं मधुर रचनेचा मनस्वी उपयोग होतो. अर्थ कळो वा न कळो नादमधुर-स्निग्ध अक्षरें रसिकाच्या मनांत गुंजन करीत राहतात. नादमधुर शद्वांची निवड मात्र त्यानें चांगली केली आणि सहजसुंदरपणें केली आहे. वामनाच्या यमकांचें अनुकरण जरी ह्यास नीट साधलें नसलें तरी अनुप्रास मात्र बराच साधला आहे. पण कित्येक ठिकाणीं अनुप्रासाचा हव्यास दिसतो. ह्या अनुप्रासांच्या खटकाळींतून अर्थाच्या सरस्वतीस नीट वाहतांहि येत नाहीं. (प्रसंग पहिला ४, ७, १२, १५, १९, २०, ३०, ३८ इ. श्लोक पहा).

त्याची शद्वसंपत्ति महाकवीच्या इतकी विपुल नाहीं तरी प्रस्तुत काव्याच्या मानानें पुरेशी आहे. शब्दासाठीं तो कधीं अडत नाहीं. शब्द त्याला भराभर सुचतात आणि त्यांत नवताहि बरीच असते. अशा सुचलेल्या शब्दांचा उपयोग तो आपल्या काव्यांत अगदीं सढळपणें करतो. त्याची शब्दांची निवड आलंकारिक आणि पांडित्यपूर्णहि क्वचित् असते. पण बहुधा त्यानें वापरलेले शब्द लोकव्यवहारांतीलच असतात. भाषादृष्ट्या ह्यानें

शब्दांचे अनेक प्रकारें उपयोग केलेले आहेत. उदा. याच्या भाषेंत जडित्कोंदण, हाटकजीन, मदनमाय, क्षुधावेळ इत्यादींसारखे समास आहेत. इंदुआनना, दयाउदधी, तमोघ्नअस्त, रविअस्त, कनकअंदु, अंबाआराम, पिभुआज्ञा इत्यादि रूपांत त्यानें संधि केले नाहींत. नामधातुः- भोळवला, धूपिली, नामार्थिला, सत्वार्थिला, भ्रांतला, विचंबला, नृत्यवीती इत्यादि नामधातूंचाहि त्यानें उपयोग केला आहे. नादानुकारी शब्द तर त्यानें पुष्कळच वापरले आहेत. त्याच्या शब्दसंग्रहांत उदयो, सूर्यो, मनवेधक, सदचिदात्मक, शिराब्ज, धिटें, साकल्य, प्रदेसी = परदेशी, प्रयंकीं = पर्यंकी, प्रजन्य = पर्जन्य, विप्रित = विपरीत, दुःखिस्त, धियंता, आमसीं, तां, निमित्य, दावाग्नळ, लेहिलेसें, रविवासरसे, दयदीप्यमानें, इंदुवगत्रा इत्यादि अबद्ध रूपें जीं त्या काळीं क्वचित शिष्टांच्याहि वापरांत होतीं. त्यांचाच कवीनेंहि उपयोग केला आहे. एकाच अर्थीं दोन शब्द वापरण्याची त्याची संवय तर मर्यादेच्या बाहेर जाते असें वाटतें. उदा. संगी-सयोगी, योगी-विरागी, मानसीं-मनीं, सुंदर-साजिरा, जाळ-जंजाळ, मृगजळासम-तुल्य, धिर-धैर्य, योग्य-समान, झडकरी-लवलाहे, त्यजुनि दुसरि, यातें-एकलें, काळवेळ-विलंब, नकळत सकळांसी-एक एकांतवासी. गुप्त-गुह्यार्थ, येक येकला-नसे सुसंग दुसरा, भुलली-भ्रांति जाली, भ्रमभूलिभरें, भ्रम-भ्रांतिकळा, साजिरा-गोजिरा, लगबग-लवलाहे, लवकरि-लवलाहें, येकला-येकदेसी, धन-संपती, भ्रांतला-विस्मीत झाला, भ्रांति पडली-भिमभूलि जडली, बळें बळनिधी-बळिवंत, स्वरूप-रूपसावळा हा नव्हे सत्य सज्जन-कूजनकूमति, क्रियाहीन-कर्मांध, जाइजे तुम्ही एकलें बरें-सगती नका नेऊं दूसरें, कुकर्मी-क्रियाहीन, जीर्णें-जुनाटें. यांत तर कांहीं श्लोकांचे चरणचे चरणहि असे योजिले आहेत. त्याचप्रमाणें ह्याचें आणिकहि एक वैशिष्टय आहे. हा एकाच शब्दास उपसर्ग लावून दुसरा तसाच नादयुक्त शब्द बनवितो आणि ते दोन्ही आपल्या रचनेंत आणतो. ह्यायोगानें नादमाधुरी निर्माण होते. उ. संचला-विसंचला, रंगले-विरंगले, लोटे-अलोटे, चारु-निचारु, संगे-सुसंगें, मनभंग-अभंग, सुखसंग-निसंग, रंग-सुरंग, रंग-विरंग. रामसुतात्मजास कांहीं विशिष्ट शब्द वापरण्याची

आवड फार दिसते. त्या शब्दांचा उपयोग तो कोणत्याहि शब्दासमवेत करतो. त्यांत औचित्य आहे कीं नाहीं इकडे तो अगदीं लक्ष देत नाहीं. उ. तुंबली, वितंड, सिमा, निज, भीम, राजित, कमनीय, अंतरांत इ.

ह्याची रचना एकंदरीत दृष्टीनें पाहतां थोडीशी शिथिलच वाटते. पुष्कळ वेळीं वाचकाला तींतून निश्चित अर्थ काढतां येत नाहीं. पुष्कळ ठिकाणीं क्रियापदांचा उपयोग केलेला नाहीं तर पुष्कळ ठिकाणीं भाषणाचा संदर्भच कळत नाहीं. कोणती व्यक्ति कोणतें भाषण करीत आहे याचा छडा लावण्यास बराच त्रास होतो. कांहीं शब्दाचे अर्थ लागत नाहीत (पण हे विरळा) तर कांहीं शब्द कोणत्या अर्थानें वापरले हे कळत नाहीं. उदा. 'तुखार,' घोडा या अर्थींहि वापरला असून कुठें तो उंट या अर्थीं वापरला असावा असें वाटतें. 'वराके' ह्याचा अर्थ हलकी, नीच असा असून तो ह्यानें श्रेष्ठ अशा अर्थीं वापरला. मात्र यावरून त्यास भाषाज्ञान नव्हतें असें मुळीच म्हणतां यावयाचें नाहीं. शब्दावर श्लेष आणि कोटचा करण्याचा त्याचप्रमाणें कूट किंवा गूढार्थक रचना करण्याचा याला बराच नाद होता असें दिसतें. उदा. इंदु, शशिवदन, शशिहास्य, रजनीकरहास्य हे शब्द तो चंद्रहास्य या नांवाचीं भाषांतरें करून वापरतो. तसेंच चंद्रवदना न म्हणतां हिमकरवदना असें तो म्हणतो तर मृगाक्षी न म्हणतां उडुपतिवहनाक्षी असेंहि म्हणतो. विवाहोत्सवांतील चंद्रज्योतीसाठीं तो इंदुज्योति शब्द वापरतो आणि सूर्यास्त-समयीं न म्हणतां तमोघ्न–अस्तसमयीं असा उल्लेख करतो. त्याचप्रमाणें चौथ्या प्रसंगांतील सातव्या श्लोकांत...आग्रह...विग्रह...निग्रह...ग्रहें ग्रहो अशी शब्दावरील कसरतहि तो करतो. अशा प्रकारें तो शब्दच्छल करून आपलें पांडित्य दर्शविण्याचा प्रयत्न करतो. आठव्या प्रसंगांतल्या ५१ व्या आणि ५३ व्या श्लोकांत तर त्यानें कूटात्मक गूढ रचनाहि केली आहे. तिचा अर्थ कळत नाहीं. ह्याच्या रचनेंत ६।६९, ७।६,७ आणि ९।१० या श्लोकांकडे पाहिलें असतांना ह्याला संगीतशास्त्राचें ज्ञान असावें असें वाटतें. या श्लोकांत गायनांतील पारिभाषिक शब्द वापरलेले दिसतात. ह्याच्या काव्यांतील शब्दसंग्रह पुढीलप्रमाणें आहे. मोहळे, ज्वाळमाळा, झळाळी,

झमझाल्लरी, स्वानकल्लोळ, घाघाटति, घळाळीत, दणाणीत, आगडधों, धुडिधों, धिडिंढोल, धडाडा, घडाडीत, भडाडीत, धमत्को, धिमित्स्वान, दुटाळा, नेटपाट, केटे, लोटे, अलोटे, दाटे, थाटे, चपेटे, किकाटे, फाकुळोटे, निघोटे, अचाट, सराटें, खेटके, निघोते, चेइरे, चित्चेतन, पारपोंडे, अतिपाडे, बोचके, दमामे, छत्रमाही, मत्स्ययंत्रें, चामरडोल, जाजावली, झळंबे, डिसाळ, ओसावली, ठाणमान, उडंगण, निकरें, वितंड, कांचबंदीं, निबंदी, रुदाविरुंदी, सवादी, जंगी, वुरंगी, मुरंगी, सुरंगला, विरंगला, संसाधना, भवभेदर, सघना, सवृति, सानुसंगीतमाने, सावमाने, राणीव, ओळगला, वृंदानना, वितंड, दंडवड, खंडखंड, खंडविखंड, आसडीतो, मुडूप, मनांतरांत, गिरीपटांत, तरूकटांत, हळफळ, गाटीं, गइटी, छदबंद, डावघाव हावभाव, सावयाव इ. अशा प्रकारें याच्या भाषेत काव्यांत वापरण्याच्या शब्दांपेक्षां लोकव्यवहारांतील विशेषत: बोलण्यांतील शब्दच सढळपणें वापरलेले दिसतात. ह्यांत मध्यकालीन भाषेतील गुणावगुणाचें निदर्शन स्पष्ट होतें.

राममुनात्मजाच्या विद्वत्तेसंबधी विशेष कांही लिहितां येत नाहीं कारण त्याचा जीवनविषयक परिचय अल्पहि प्रमाणांत उपलब्ध नाहीं. पण त्याच्या काव्यरचनेंतील कांही स्थळींच्या कूटतेवरून आणि पंडिती थाटाच्या रचनेवरून त्याचा संस्कृत, पौराणिक वाङ्मयाशीं परिचय असावा असें वाटतें. पंडिती कवीचें वैशिष्टय वृत्तवैचित्र्याच्या रूपानेंहि त्याच्या काव्यांत आढळतें. त्यानें आपल्या काव्यांत मोठ्या चोखंदळपणानें अनेक प्रकारच्या वृत्तांची योजना केली आहे. त्यांने योजिलेलीं वृत्तें पुढीलप्रमाणें आहेत:—

शार्दूलविक्रीडित, चामर, पचचामर, कामदा, शुद्धकामदा, द्रुतविलंबित शालिनी, मालिनी, उपजाति, भुजंगप्रयात, तोटक, प्रमाणिका, विबुधप्रिया, वसंततिलका, इंद्रवज्रा, रथोद्धता, दोधक, ज्वाला, मंदिरा, मनोहर, स्वानंद, आणि वनमाला. यांत भुजंगप्रयात वृत्तांत त्यानें ३५८ श्लोक म्हणजे जवळजवळ अर्धी रचना केली आहे आणि प्रमाणिका वृत्तांत शंभराच्या वर श्लोक आहेत. त्यांच्या खालोखाल द्रुतविलंबित, तोटक, वसंततिलका, शार्दूलविक्रीडित, विबुधप्रिया नि मालिनी आहेत. एकंदरींत त्याची वृत्तांची निवड

चांगली आहे. साध्या भावनेला आणि सोप्या विचाराला सहज आपल्या चालीनें चालवीत चालवीत हीं वृत्तें नेतात. यायोगानें स्निग्धता नि प्रसन्नता उत्पन्न होते. ह्या वृत्तांसंबंधीं एक गोष्ट अशी कीं त्यानें कांहीं नांवें स्वतंत्रहि दिलीं आहेत. तीं सहज कोठें ऐकिवांत नाहींत. त्याच्या काळीं तीं नांवें कदाचित् रूढ असतील. हीं वृत्तें रचतांना कवि भावनेच्या किंवा विचारांच्याच मागें असल्याकारणानें तो शब्दासाठीं अडत नाहीं. समोर आलेले शब्द वृत्तामध्यें जर सुखासमाधानानें बसत नसतील तर त्यांच्या स्वरूपाकडे आणि तो व्याकरणाकडे तो लक्ष देत नाहीं. ऱ्हस्वदीर्घादि फेरफार तो आपल्या इच्छेनुसार करतो. वृत्तसुखार्थ त्यानें शब्दांची अशी फार आबाळ केली आहे.

त्यानें आपल्या काव्यास जी भुजंगप्रयाताची निवड केली तिजवरून आणि तत्कालीन लोकव्यवहारांतले जे शब्द घेतले त्यांजवरून ही निवड करतांना त्याच्यापुढें समर्थांची रचना होती कीं काय अशी शंका येते. इतकेंच नव्हे तर त्याजवर रामदासांच्या संप्रदायाचा आणि वाङ्मयाचाहि फार परिणाम झाला होता असें वाटतें. कदाचित तो रामदासपंथी असावा अशीहि शंका येते. समर्थांच्या समाधिकालीं ह्याचें वय ९।१० वर्षांचें येतें. यास्तव हें असें होणें फार संभवनीय आहे. त्यासाठीं याच्या काव्यांतील पुढील गोष्टी पाहणें. रामसुतात्मजानें ग्रंथारंभीं गणपतीस नमन न करतां "आधीं प्रेमनिधी दयाळ उदधी श्रीमारुती चिंतिला" आहे. समर्थांची मारुतीविषयींची निष्ठा सुप्रसिद्धच आहे. तिचाच परिणाम असा असणें शक्य आहे. चंद्रहासाची दाई मरतांना नगरस्त्रियांस चंद्रहासाचा सांभाळ करण्यास सांगते. तें सर्व कार्य 'रामार्पण बुध्दीनें' करा म्हणते, ते श्लोक असें :—

रामार्पणें सकळ कारण माय कीजे
रामार्पणें भजन भोजन यासि दीजे
रामार्पणें शयनआसन जाणवीजे
रामार्पणें सखि तुम्ही प्रतिपाळ कीजे ॥५॥

रामार्पणें हेत मनीं धरा वो
रामार्पणें पूर्ण कृपा करा वो
रामार्पणें जीवन यासि द्या वो
रामार्पणें भोजन पूरवा वो १।५२
श्रीराम रामार्पणें बाळ घ्या वो
श्रीराम रामार्पणें खेळवा वो
श्रीराम रामार्पणें बुध्दि द्या वो
श्रीराम रामार्पणें शीकवा वो १।५३

त्याचप्रमाणें नगरस्त्रिया चंद्रहासास म्हणतात :—

" म्हणोनि शोक सांवरी । श्रीराम अंतरीं धरी
त्यजूनि दुःख वोवरी । अपार खंति सांवरी " १।।६२

या श्लोकांतील "श्रीराम अंतरीं धरी" यावरून रामसुतात्मजाच्या मनावर रामदासी शिकवणीचा परिणाम झालेला आहे हें स्पष्टच होतें. तसेंच :—

मेघःश्यामा उत्तमा चिद्विलासा । चीदानंदा चिद्‌घना चित्प्रभासा ॥
सीताकांता अच्युता श्री अनंता । माता पीता तूं मला बंधु दाता ।।२।४१

हा श्लोक रामदासी रचनेचें स्मरण करून देतो. रामदासांच्या 'मना सज्जना' ची जाणीव करून देणारा श्लोक म्हणजे :—

" पुढें भूप राजासवें बैसवीला । सुखें सर्व राणीव आली तयाला
बळे आगळा चंद्रहास्या महोला । करी काय आज्ञा जना सज्जनाला ३।३०.

३।५१ श्लोकांत तर कवीनें श्रीरामाला 'सखा सोयरा' मानिलें आहे. 'सदा सर्वदा भक्तिपंथें असावें' किंवा 'भज मना हृदयीं रघुनंदना' या श्लोकांत रामदासांची श्रीरामाच्या भक्तीची भावना या काव्यांत अनेक वेळां व्यक्त झालेली दिसून येते.

सावधान सावधान सावधान साधनी। सुचित्त सावधान तूं अखंड रामचिंतनीं
समीप साध्य साधनास देव साधिती मनीं।
सखा करूनि सद्गुरु करा स्वहीतशोधनी

यांतील सावधानपणाची सूचना रामदासानें 'सावधान असावें' अशा केलेल्या सूचनेप्रमाणेंच नाहीं असें कोण म्हणू शकेल? 'धनेसी मनें याचके धन्य केलीं-विवेकें किती कीर्ति होऊनि गेली' ही रामसुतात्मजाची रचना आणि 'विवेक चित्तीं धरावा' ही रामदासांची मनाच्या श्लोकांतील रचना यांत किती तरी साम्य आढळतें. तसेंच

" मुळारंभ चैतन्य–माया शिवे तूं। करीं कोटि ब्रह्मांड-माळा तुझी तूं ।।
शिवे आदि ओंकार बीजाक्षरे तूं। सदानंद आनंदले ब्रह्म ते तूं ।।

या श्लोकावरून रामदासाच्या मनाच्या श्लोकांतील पहिल्या श्लोकाची आठवण झाल्याविणा राहात नाहीं. सारांश रामदासी विचारांचा याच्या मनावर पूर्णपणें पगडा बसला होता. याशिवाय नादानुसारी शब्दयोजना, शिथिल रचना, वृत्तसुखार्थ केलेली शब्दाची ओढाताण, ओबडधोबड शब्दयोजना, वर दिलेला शब्दसंग्रह आणि रामदासी काव्यांतील दोषाचेंहि अनुकरण गुणांप्रमाणें याच्या काव्यांत दृष्टोत्पत्तीस येते. त्याचे समकालीन वामनपंडित यांचाहि ठसा याच्या काव्यात दिसतो आणि तो यमकानुप्रासाच्या योगानें अगदीं खणखण आवाज करतो.

एकंदरीत रामसुतात्मजाचें काव्य हें बऱ्यापैकी असून रामदासांच्या नंतरच्या कवींत तो मोडतो. त्याची विद्वत्ता साधारण प्रतीची असून काव्याची प्रतिभाहि तशीच आहे. या काव्यांत फारसा कल्पनाविलास नसला तरी सहज साधेपणा आणि श्रवणसुलभता ह्याच्या रचनेंत फार आहे. ओज, प्रसाद आणि माधुर्य यांतून याच्या रचनेंत माधुर्य ओतप्रोत भरले आहे. पण त्यानें कांहीं स्थळीं योजिलेली कूट रचना आणि पडिती यांवरून त्याचे संस्कृत वाङ्मयाचें परिशीलन असावें असें वाटतें. तो बहुश्रुत आणि व्युत्पन्न असावासें निश्चित वाटतें. कल्पनाकुसरीपेक्षां भावना द्योतनावरच आणि शब्दावडंबरापेक्षां साधेपणावरच त्याचें लक्ष केंद्रित आहे

मराठी राज्याची स्थापना झाल्याबरोबर जी एक कवित्वाची लाट उसळली होती तिच्यांतील ही निर्मिती आहे. रसांचे सागर जरी येथें नसले तरी रसिकांच्या रसपानापुरती व्यवस्था कवीनें येथें करून ठेवली आहे. महाकवीच्या पदवीस जरी हा पोचत नसला तरी सामराज, विठ्ठल, नागेश इ. कवीच्या काव्यसरणीनेंच हा कवि चालत आहे. या मध्यकालीन कविमंडळांत आपणा स्वतःसाठी एक स्थान रामसुतात्मजानें निश्चित निर्माण करून ठेवलें आहे.

– डॉ. ना. गो. नांदापूरकर

# चंद्रहास्य कर्ता

## कवि : रामसुतात्मज

### ( चरित्रविषयक माहिती )

ले : विश्वनाथ अंबादास कानोले
नांदेड

चंद्रहास्याच्या लोकप्रिय व पौराणिक कथेवर रामसुतात्मज नामक एका कवीनें निरनिराळया वृत्तांत रचलेलें सुंदर व रसपूर्ण असें श्लोकबद्ध काव्य मराठवाडा साहित्य परिषदेकडून आज पुस्तकरूपानें प्रसिद्ध होण्याचा योग जुळून येत आहे ही आनंदाची गोष्ट होय.

माझ्या संशोधनसंभारांतील या चंद्रहास्य काव्याने प्रसिद्धीच्या क्षेत्रांत जी आघाडी मारली तिचें श्रेय मजपेक्षां मराठवाडा साहित्य परिषदेचे अध्यक्ष आणि हैदराबाद राज्याचे विद्याधिकारी श्री. सेतुमाधवराव पगडी आणि परिषदेचे कार्याध्यक्ष प्राध्यापक रा. ब. माढेकर यांच्याकडेच विशेषत: जातें. ऑगस्ट १९५३ नादेडास उभयतांची भेट झाली. तेव्हां परिषदेच्या 'प्रतिष्ठान' मासिकातून क्रमश: प्रसिद्ध करण्याकरितां एखादें चांगलें काव्य देण्याची गोष्ट त्यांनीं मजजवळ काढली. या कल्पनेस मी अनुमति दर्शविली. प्रसिद्धीसाठी चंद्रहास्य हें काव्य त्या भेटीतच मी प्राध्यापक रा. ब. माढेकरांच्या स्वाधीन केले.

डिसेंबर १९५३ च्या अंकापासून चंद्रहास्यकथेची संहिता 'प्रतिष्ठान' मासिकांतून प्रसिद्ध होण्यास आरंभ झाला. त्यापुढील अंकांतून प्रस्तुत काव्याचे दहा सर्ग क्रमश: प्रसिद्ध होऊन ग्रंथ पूर्ण झाला.

\+ \+ \+

'प्रतिष्ठान' मासिकाच्या ऑक्टोबर १९५३ च्या अंकांत प्रस्तुत चंद्रहास्यकथेचा आणि कविचरित्राचा अल्पसा परिचय करून दिला. हें काव्य उपलब्ध झालें तेव्हांपासून कवीच्या माहितीचा छडा लावण्याचा मी प्रयत्न करीत आहे; पण नि:संदिग्धपणें चरित्र सांगतां येईल अशी निर्णायक

आणि समाधानकारक माहिती अद्याप तरी उपलब्ध होऊं शकली नाहीं. जसजशी माहिती मिळत गेली तसतसे समजुतींत व तपशीलांत अनेक वेळां फेरबदल करावे लागले आहेत.

कै. वि. ल. भावे यांच्या 'महाराष्ट्र सारस्वत' या ग्रंथांत आणि अन्यत्र रामसुतात्मजासंबंधीं थोडीशी माहिती प्रसिद्ध झाली आहे. ही माहिती रामासुतात्मजाच्या नांवावर मोडणाऱ्या ग्रंथांतील अंतःप्रमाणांशीं ताडून पाहणें अगत्याचें आहे. या कवीचे ग्रंथच काय ते कविचरित्रासंबंधीं कांहीशी माहिती देतात. इतर अवांतर पुरावा असावा तितका सध्यां तरी उपलब्ध झालेला नाहीं.

\+ \+ \+

रामसुतात्मज हें कवीचें टोपण नांव आहे. महाराष्ट्र सारस्वतांत रामसुतात्मज या कवीचें नांव 'मुळाजी' असें दिलें आहे. 'गोपीचंद' आख्यानांतील पुढील चरण प्रस्तुत ग्रह होण्यास कारणीभूत असावेत.

"ऋग्वेद वसुपुरी ग्रामतळी ।
अभिधान '**मुळाजी**' नाम असे ।"

या चरणांतील 'मुळाजी' हा पाठ चूक असावा. मुळांत 'तुळा जी' असाच पाठ असणें इष्ट आहे. या चरणांत कविनामाचा उल्लेख नसून कवीच्या ग्रामाचा उल्लेख आहे ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. द्रौपदी-वस्त्रहरणांतहि

'वसुची पुरी ती तळी ग्राम आहे ।
जयाचें 'तुळा' नाम हें शोभताहे ।'

असा याच कवीनें उल्लेख केला आहे. तेव्हां कवीचें नांव 'मुळाजी' असावें हें सारस्वतकारांचें म्हणणें निराधार आणि चूक आहे.

कवीचें नांव निश्चित करण्याच्या दृष्टीनें चंद्रहास्यकथेंतील पुढील उल्लेख लक्षणीय आहे.

"कथा भारतीची मनोरम्य वाणी । असे भक्तिभावार्थ आनंदखाणी ॥
जनें चिंतिला देव सारंगपाणी । असे तो कवि विश्वनाथाभिमानी ॥"

चंद्रहास्यकथा सर्ग १०:८६

प्रस्तुत काव्याच्या मुदखेड प्रतींत 'विश्वनाथाभिमानी' असा पाठ आहे, तर अर्धापूर येथें मिळालेल्या पोथींत 'विश्वनाथाभिधानी' असा पाठ आढळतो. या दुसऱ्या पाठावरून कवीचें नांव विश्वनाथ असलें पाहिजे असें निश्चित· पणें म्हणतां येतें. या उपसंहारात्मक श्लोकानें स्वतःच्या नांवाचाच उल्लेख करण्याचा कविमानस असावा हें स्पष्ट आहे.

या विवेचनावरून रामसुतात्मजाचें नांव महाराष्ट्र सारस्वतकार म्हणतात त्याप्रमाणें 'मुळाजी' नसून 'विश्वनाथ' आहे असें म्हणणें भाग आहे.

\+ \+ \+

द्रौपदी–वस्त्रहरण या काव्यांत कवीनें स्वतःच्या माता-पितरांचा आणि कुळगोत्राचा उल्लेख पुढीलप्रमाणें केला आहे.

जयाचा पिता नाम वीनायकाचें । यशोदा अभीधान मातेसि साचे ।
मुळारंभ हा वेद सुदर्य आहे । सुरारीरिपूचा गुरु गोत्र पाहे ॥२३२॥

प्रथम तरि क्षिराब्धी दीधला ज्यासि पाहे ।
सजन मित्रवर्ण हें दुजें नाम आहे ।
यदुपति वनितेचा तातग्रामाभिधानी ।
प्रवर तिन तयाचे साजिरे दिव्यवाणी ॥२३३॥

– द्रौपदी-वस्त्रहरण

यावरून रामसुतात्मजाच्या पित्याचें नांव विनायक आणि मातेचें नांव यशोदा आहे हें स्पष्टच आहे. 'मुळारंभ हा वेद सुदर्य आहे.' या चरणानें कवि ऋग्वेदी असल्याचें निवेदन करीत आहे. स्वतःच्या गोत्र आणि प्रवरांचा उल्लेख मात्र कवीनें कूटपद्धतीनें केला आहे. 'सुरारीरिपूचा गुरु' हें त्याचें गोत्र आहे. देवांचा शत्रु रावण. त्याचा रिपु राम. रामाचागुरु वसिष्ठ. यावरून कवीचें गोत्र वसिष्ठ हें सिद्ध होतें. त्याचप्रमाणें कवीचे प्रवर. ज्याला क्षीरसागर दिला तो उपमन्यु. दुसरा प्रवर मित्रावरुण आणि तिसरा प्रवर म्हणजे यदुपतिवनितेच्या (रुक्मिणीच्या) पित्याच्या गांवाचें नांव, कौंडिण्य. यावरून कवि ऋग्वेदी वसिष्ठगोत्री उपमन्यू, मित्रावरुण, कौंडिण्य या त्रिप्रवराचा आहे.

\+ \+ \+

ज तो शक वेदफणींद्रतिथी ऋषि आत्मज तो परिधावि असे।
वर्षाऋतु, श्रावण शुद्ध बिजे, भृगुवार, मघा उडु पूर्ण दिसे
वरयान घटी, शरवेद इति उदघोतनयेसिहि जन्म दिसे
कवि रामसुतात्मज दास नवा रूप पद्मतळातळि राजतसे ॥२३०॥

– द्रौपदी–वस्त्रहरण

द्रौपदी–वस्त्रहरणांतील वरील श्लोकांत कवीनें आपला काळ शक, सवत्सर, ऋतु, मास, पक्ष, तिथी, वार, योग, घटी नक्षत्रासहित केला आहे. हा काळ म्हणजे शके १५९४ परिधावी संवत्सर श्रावण शुद्ध द्वितीया शुक्रवार, वरयान योग, मघा नक्षत्र ४५ घटका असा आहे. महाराष्ट्र सारस्वतांत हा द्रौपदी–वस्त्रहरण या ग्रंथाचा काल म्हणून दिला आहे. तो बरोबर वाटत नाहीं. तो कवीचा जन्मकालच असला पाहिजे. कवीचें आयुर्मान सामान्यतः साठसत्तर धरण्यास हरकत नाहीं. तेव्हां १५९४ ते १६६० हा या कवीचा काल म्हणतां येईल. सुश्लोककार वामनपंडित वामनात्मज रघुनाथ शेष, बीडकर विठ्ठल कवि, कचेश्वर नागेश या कवींच्या पाठोपाठ हा कवि उदयास आलेला दिसतो. कवि या नात्यानें त्याची गणना उपरोक्त पंडित कवींच्या मालिकेंतच करावी लागेल.

\+ \+ \+

त्यानंतर महत्त्वाचा प्रश्न हा कवीच्या वास्तव्यस्थानाचा आहे.

वसूची पुरी ती तळीं ग्राम आहे। जयाचें 'तुळा' नाम हे शोभताहे
वसे मंडळी सर्व ही सज्जनाची। पहा वस्ति ते रामसुतात्माजाची ॥२३१॥

द्रौपदी–वस्त्रहरण

या उल्लेखावरून वसुपुरीच्या तळी 'तुळा' नांवाच्या गांवीं कवि राहत असे तेथे सज्जनाची वस्ती असे. असा निष्कर्ष निघतो.

'ऋग्वेद वसुपुरी ग्राम तळीं अभिधान 'तुळा' जी नांव असे।'

– गोपीचंदाख्यान

गोपीचंदाख्यानांतील या उल्लेखावरूनहि वसुपुरीच्या तळीं तुळा नांवाच्या गांवीं कवि राहत असे. या विधानास दुजोराच मिळतो. तथापि ही 'वसुपुरी' कोणती? तिच्या तळीं 'तुळा' नांवाचें गांव कुठे आहे हें निश्चित करतां येत नाहीं.

चंद्रहास्यकाव्यांत कवीनें चंद्रहास्याच्या विवाहप्रसंगीं रचलेल्या मंगलाष्टकांत मोठया नद्यांचा उल्लेख करतांना मराठवाड्यांतील अगदींच लहान अशा कांही नद्यांचाहि उल्लेख आला आहे. पुढील मंगळाष्टक बघा :–

'गोदा, नारद, सिंधुफेन, दुधना, पद्मावती कोयना,
पीनाकी, प्रहरा, सुवर्णनलिनी, पूर्णावती, कामना,
तैसी सिंधुवती, कयाधु, वनजा, श्रीतुंगभद्रांगना,
शोभे पिंगळगंडिका, श्रीगरुडा, देवादलं मंगलम् ॥'

यांतील, पूर्णा, दुधना, सिंधफणा, कयाड किंवा कयाधु, पिंगळगंडिका या नद्या परभणी जिल्ह्यांतील आहेत. यावरून कवीचें वास्तव्य परभणी जिल्ह्यांत असावें, असें अनुमान करतां येतें. त्याच अनुरोधानें 'वसुची पुरी' आणि 'तुळा' हीं नांवें निश्चित करावयास पाहिजेत. त्यासंबंधीं निर्णायक सध्याच सांगतां येत नाही. कांही अनुमाने तेवढीं देतां येतील.

१) परभणी जिल्ह्यांतील वसमत किंवा, वसुमति हें ठिकाणहि वसूची पुरी असू शकेल. तेथे तलावळेंहि आहे. पण जवळ 'तुळा' गांव असल्याचें दिसत नाही.

२) कवीची कूट प्रीति लक्षांत घेतां 'वसुचीपुरी' याचा अर्थ वसु = अष्ट. वसुचीपुरी = अष्टी असा घेतां येईल. परभणी आणि बीड-जिल्ह्यांत अनेक गावे 'अष्टी' नांवाचीं आहेत.

३) 'तुळा' या नांवाचाहि असाच अर्थ बसवितां येईल तूळ = कापूस तुळा = कापशी. या नांवांचींहि गांवें आढळतात.
तथापि कवीनें उल्लेखिलेल्या तपशीलाचें गांव मात्र निश्चित करतां येत नाहीं. यासबंधीं अधिक संशोधन होणें अगत्याचें आहे.

+ + +

महाराष्ट्र सारस्वतकारांनीं रामसुतात्मज या कवीच्या नांवावर द्रौपदी–वस्त्रहरण आणि गोपीचंदाख्यान हीं काव्यें दिलीं आहेत. रामसुता-

त्मजासंबंधीं विशेष माहिती नसल्यानें असेल कदाचित् प्रस्तुत काव्यें विठ्ठलकवि बीडकर किंवा कचेश्वर यांच्या नांवावर मोडत होतीं.

रामसुतात्मजानें लिहिलेले ग्रंथ सध्यातरी पुढीलप्रमाणें उपलब्ध आहेत:

१) द्रौपदी-वस्त्रहरण. २) गोपीचंद आख्यान

३) चंद्रहास्य कथा. ४) सती अनसूया सत्त्व परीक्षा.

द्रौपदी-वस्त्रहरण हें काव्य कै. वि. ल. भावे यांनीं संपादिलेल्या 'महाराष्ट्र कवि' या मासिकांत प्रसिद्ध झालें आहे. या काव्यांत २३४ श्लोक आहेत. हें काव्य लहान असलें तरी सरस आणि शब्दालंकारांनी नटलेलें आहे. 'रामसुतात्मज दास नवा' असा कवीनें स्वतःचा उल्लेख केला आहे. त्यावरून ही त्याची प्रारंभींची कृति असावी. या काव्यपुष्पानेंच शारदेची पूजा बांधण्यास कवि सिद्ध झाला असावा असें अनुमान करणें वावगें ठरणार नाहीं.

कवीचा परिचय जरी मराठी रसिकांना झालेला होता तरी त्याचें चंद्रहास्य काव्य मात्र अद्याप पावेतों प्रकाशांत आलें नव्हतें. तें रामसुतात्मजानें लिहिलें असल्याचा उल्लेखहि कुठें आढळत नाहीं.

नांदेडजवळ मुदखेड हें गांव आहे. मुदखेड, मुक्तक्षेत्र, मुक्तिग्राम अशीं या गांवाची जुनी नांवें असून येथें मंदिरांचीं जीं वास्तुशिल्पें व अवशेष दिसून येतात त्यावरून हें गांव प्राचीनांत मोडण्यासारखें दिसतें. येथें कोरण्ये नांवाचें जुनें पंडितघराणें असून या घराण्यांतील विद्वान व्यक्तींनीं लिहून ठेवलेला संस्कृत व प्राकृत ग्रंथांचा संग्रह फार मोठ्या प्रमाणांत त्यांच्याकडे होता. हल्लीचे श्री. मोरेश्वर उर्फ बापुशास्त्री यांच्याजवळील संग्रहांतूनच मला प्रस्तुत चंद्रहास्य काव्याची एक हस्तलिखित प्रत उपलब्ध झाली. ही प्रत शके १६६४ मध्यें 'शिवानंदानुचर शंकरसुत शिवदास' यानें लिहिली आहे. प्रतलेखक याच जोशी किंवा कोराण्ये घराण्यांतील असावा.

चंद्रहास्य काव्याची आणखी एक प्रत नांदेडजवळील अर्धापूर या गांवीं उपलब्ध झाली. प्रतीच्या शेवटीं, लेखकानें पुढीलप्रमाणें कालनिर्देश केला आहे :-

" ।। चंद्रहास्य पुराण, प्रसंग दहावा पूर्ण. हस्ताक्षर संताजी शामजी पतकी परगणे मनाठे ।। शके १६... बहुधान्य नामसंवत्सरे श्रावण वद्य अमावास्या समाप्त. सन हजार (हिजरी ?) अकराशे अडुसष्ट ११६८ माहे जिल्हेज ..'

मुदखेड प्रत ही अर्धापूर प्रतीपेक्षा अधिक चांगली आणि भाषेच्या व पाठाच्या दृष्टीनें सरस आहे. तथापि मुदखेड प्रतींत जे पाठ व शब्द लागत नाहीत ते समजून घेण्याच्या दृष्टीनें अर्धापूर प्रतीचें महत्त्व दृष्टीआड करतां येत नाहीं.

याव्यतिरिक्त कवि रामसुतात्मजाचे सती अनसूया-सत्त्व-परीक्षा हें पन्नास (५०) श्लोकांचें एक लहान प्रकरण भोकर मुक्कामीं मिळालें आहे. या बाडाचा लेखन शक १६८७ आहे. रामसुतात्मजाची रचनाशैली व पदपंक्तीची धाटणी या छोटया काव्यावरूनहि तावडतोब लक्षांत येते. हेंहि काव्य आतापर्यंत अप्रसिद्ध आहे. या काव्यांतील काहीं श्लोक वानगी म्हणून पुढें देण्यांत आले आहेत.

"करुणा सति आति मना सुमती । करतो कर जोडुनिया विनती ।।
म्हणती सति दे मज प्राणपति । सदने वदने मजलाग किती ।।४५।।
प्रवाळाधरा वातवेगें निघाली । कृशांगी पुढे बाळ घेऊनि आली ।।
म्हणे हाटकांगी पती वोळखावो । घरा आपुलाले करी सोघ्र न्यावो ।।४६।।
गुणांच्या तुम्ही सुदरा रम्यशक्ति । पति ओळखावा आपुले दिव्य दीप्ति ।।
रूपें सारखीं त्यास कांहीं कळेना । अवस्था मनीं लागली आवरेना ।।४७।।
तिचे सत्त्वसामर्थ्य देखोनि दृष्टि । मिळाले ऋषी देव गंधर्व कोटी ।।
पुढे रेणुराजात्मजे प्राणनाथे । त्वरे आणिली कामधेनु महीते ।।४८।।
तयेचे क्षिरें सर्वही त्रुप्त जाली । पुढे सुंदरीची बहु स्तुती केली ।
तिने बाळकाचे पुन: देव केले । तिते सर्व वंदुनि स्वर्गासी गेले ।।४९।।
सती धन्य लोकत्रयामाजि जाली । पती वंदिला मंदिरामाजि गेली ।।
करी आदरें पुजने वल्लभाची । वदे भारती रामसुतात्मजाची ।।५०।।
— अनसूया-सत्त्वपरीक्षा

माझ्याजवळील संग्रहांतील एका बाडांत गोपीचंद आख्यानांतील कांहीं हिंदी दोहे व मराठी श्लोक आढळले आहेत. यांतील कांहीं श्लोक पुढे दिले आहेत.

झडकुनि करि कंथा तो निघे वीतरागी ।हटकुनि निजसंगी चालिला लागवेगी ।।
कठिण मन तयाचे जाहलेसे सुरंगी । सकळ विकळ ।बळा शोकसिंधु तरंगीं

× × ×

कुपांतुन काढी प्रभु सिद्ध कैसा । नभातुन बाहेर ये सूर्य जैसा ।।
किती मानिला पुजिला गौरवीला । दिनानाथ सिंहासनीं बैसविला

× × ×

किती निति सांगु चंपावतिला । विरागें सटवीला चुकाऊनि गेला ।।
मनीं चिंतिला नाथपथिं निघाला । कवि रामसुतात्मजें ग्रंथ केला ।।

\+ + +

रामसुतात्मज हा कवि कोणत्या परंपरेंतील आहे ? त्याचा उपासनासंप्रदाय कोणता त्याचें 'कुलदैवत कोणतें ? असे अनेक प्रश्न उपस्थित होतात. यासंबंधीं सर्व अनुमानें केवळ कवीच्या ग्रथरचनेवरच आधारावीं लागतात. रामसुतात्मजानें चंद्रहास्य काव्यांत एकवीरा श्रीरेणुकेचा नमनांत व मंगलाष्टकांत एक दोन वेळां उल्लेख केला आहे. त्यावरून एकवीरा श्रीरेणुका कवीची कुलदेवता असावी असें वाटतें.

काव्याच्या प्रारंभीं सर्वसामान्य परिपाठ सोडून कवीनें श्रीमारुती वंदन केलें आहे. तें चिंतनीय आहे. कदाचित् ती कवीची उपास्यदेवता असेल.

वर्णन प्रसंगाच्या अनुरोधानें रामसुतात्मजानें चंद्रहास्य काव्यांत नाथादि गुरुत्रय, नवनाथ, भैरव, सिद्धयोगिनी, मुद्रा, आगम व दीक्षा साधनादि मंत्र तंत्राचा कोठें कोठें उल्लेख केला आहे. त्यावरून हा कवि आनंद संप्रदाय किंवा ज्यास चक्रेश्वरी उपासना म्हणतां येईल त्या परंपरेंतील असावा असें वाटतें.

श्रीनाथादि गुरुत्रयं गणपतिं पीठत्रयं भैरवम् ।।
सिद्धेभ्यो बटुकत्रयं पदयुगं दूतिक्रमं शांभवम् ।।

वीरे चाष्ट चतुष्ट षष्टि नवकं वीरावली पंचकम् ॥
श्रीमन्मालिनि मंत्रराज सहितं वन्दे गुरोर्मण्डलम् ॥

— कपिल गीता.

शक्ति उपासनेच्या सांप्रदायिक ग्रंथांतून आढळणाऱ्या उपरोक्त प्रसिद्ध श्लोकाचे रामसुतात्मजाने चद्रहास्य काव्याच्या दहाव्या सर्गांत पुढील प्रमाणें जसेंच्या तसें रूपांतर केलें आहे.

आदिनाथ तथा गुरुगणपती सयुक्त वीरावली ।
पीठं भैरव सिद्धकमं बटु ही हे शोभले श्रीवळी ॥
शास्त्रेशांभव वेदमंत्र मदिरा भागीरथी भूतळी ।
केली पूर्ण पुजा शिवे प्रतिवदे जोडूनि बद्धाञ्जली ॥२२॥

जैमिनी अश्वमेधांतील मूळ चद्रहास्य कथेशीं या श्लोकाचा कांही संबंध नाहीं.

तसेंच दहाव्या सर्गातील पुढील देवीस्तवहि कवीची उपासना परंपरा दर्शविते.

क्षर अक्षर अक्षय तुं जननी । सचराचर सार जनीं विजनी
निगमागम माय तुझ भजनी । रमती सुरसिद्ध दिवा रजनी ॥२६॥
मुळारंभ चैतन्य माया शिवे तूं । करी कोहि ब्रह्मांड माया तुझी तू ।
शिवे आदि ओंकार बीजाक्षरें तू । सदानद आनदले ब्रह्म तें तूं ॥२७॥

\+ + +

कवीच्या गुरूचें नांव काय ? गुरुपरंपरा कोणती यावर पुरेसा प्रकाश कवीच्या रचनेवरून पडत नाहीं. चद्रहास्य काव्यांत गुरूस नमन केलें आहे. पण गुरुचा नामोल्लेख मात्र नाही.

सच्चिदात्मक चिन्मय आगरु । अचल चिद्घनचंद्र मनोहरु ।
अपरपार परापर सागरु । अढळ ब्रह्मसखा मज सद्गुरु ॥

— चंद्रहास्य सर्ग १

या श्लोकांतील 'चिन्मय आगरु' या पदावरून रामसुतात्मजाच्या गुरूचें नांव 'चिन्मयानंद' तर नसेल, असा तर्क सहज निर्माण होतो.

महाराष्ट्र सारस्वतांत रामसुतात्मजाच्या गुरूचें नांव 'विश्वंभर-नाथ' असें दिलें आहे. त्यास गोपीचंदाख्यानांतील पुढील दोहा आधारभूत असावा.

जोगजुगताहां अलखनिरंजन । निरमल मारग मातरे जु ।।
उलटपंथ मेरा, अपार निरामय । जोगी विश्वंभरनाथ रे जुं ।।

हें विधान तितकेसें पटत नाहीं. गोरख, मच्छिंदर यांच्याविषयींच्या हिंदी कवनांतून निरनिराळ्या कवींनीं नाथ, निरंजन, अलख, प्रभुनाथ, विश्वंभर हीं विशेषणें वारंवार वापरली आहेत. तेव्हां उपरोक्त 'विश्वंभरनाथ' हें पद रामसुतात्मजाच्या गुरूच्या नांवाचें निदर्शक असावें असें वाटत नाहीं.

\+ + +

रामसुतात्मज या कवीची माहिती जेवढी उपलब्ध होऊं शकली तेवढी वर दिली आहे. कांहीं जणांच्या मनांत कदाचित् अशी शंका निर्माण होण्याची शक्यता आहे कीं, महाराष्ट्र सारस्वतांत द्रौपदी-वस्त्रहरणाचा कर्ता म्हणून उल्लेखिलेल्या रामसुतात्मज आणि चंद्रहास्य काव्य लिहिणारा रामसुतात्मज एकच कीं भिन्न, या प्रश्नाचें उत्तर दोन्ही ग्रंथांचा बरवर अभ्यास केला तरी असें स्पष्टपणें सिद्ध होते कीं दोन्ही काव्यांचा कर्ता एकच आहे. भाषा, शैली, अलंकारप्राचुर्य, फार काय विज्ञाप्तीच्या श्लोकांतील साम्य हें अभिन्नत्व सहज सिद्ध करतात.

(१) कथा ऐकतां सर्व ही दोष जाती । अघें नासतीं सर्व जाती दिगंती ।।
असें न्यून तें पूर्ण संती करावें । पद प्रास अर्थी बरें वोवरावें ।।८५।।
चंद्रहास्य सर्ग १०

कथा वाचितां ऐकतां दोष जाती । अघें नाशुनी सर्व जाती दिगंती ।।
असें न्यून तें पूर्ण संती करावें । पदप्रास अर्थी बरें वीवरावें ।।२३४।।
— द्रौपदी—वस्त्रहरण

(२) मनोरम्य रंजे कथा भारतीची । महाज्ञान वैराग्य गंगा गुणाची ।।
जयामाजि हें कीर्ति दामोदराची । वदे भारती रामसुतात्मजाची ।।८४।।
— चंद्रहास्य सर्ग १०

सभापर्विची हे कथा पूर्ण झाली। यदूनायकें सर्व संपूर्ण केली ।।
जयामाजि हे कीर्ति नारायणाची। जना तारिते भीमपाळी भवाची ।।२२९।।

–द्रौपदी–वस्त्रहरण.

यावरून रामसुतात्मज एकच. दोन नव्हेत. हें सांगण्याची आवश्यकता वाटत नाहीं.

\+ + +

रामसुतात्मजासंबंधीं विचार करतांना असें स्पष्टपणें वाटतें कीं आतांपर्यंत उपलब्ध झालेली माहिती पुरेशी समाधानकारक नाहीं. अनेक अनुमानें इतर उपोद्बलक पुराव्यांनीं सिद्ध व्हावयास हवीत. उत्तरोत्तर जसजसें या प्रकरणीं संशोधन होत जाईल तसतसा या कवीच्या जीवनचरित्रावर अधिक प्रकाश पडेल आणि एका चांगल्या कवीचें जीवनचरित्र समजल्याचें समाधान रसिकांना लाभेल.

चंद्रहास्याची कथा अति लोकप्रिय आहे. यावर स्वतंत्र आख्यानपर रचना नाहीं. त्यादृष्टीनें प्रस्तुत प्रकाशन महत्त्वाचें आहे. अशा काव्याचें मार्मिक रसग्रहण करण्यास डॉ. ना. गो. नांदापूरकर यांच्यासारख्या अधिकारी व्यक्तींची जोड मिळाली हा 'मणिकाचनयोगच' म्हणावा लागेल.

प्रस्तुत काव्याचा संशोधक या नात्यानें कविचरित्र मला लिहिण्यास सांगण्यांत आलें. त्याप्रमाणें मी लिहिलें. रामसुतात्मजाच्या शब्दांत मला रसिकांना एकच विनंती करावयाची आहे. ती ही –

असें न्यून तें पूर्ण संतीं करावें।
पदप्रासअर्थीं बरें वीवरावें ॥

# चंद्रहास्यकथा

श्री

चंद्रहास्यकथा

श्रीगणेशाय नमः

श्रीसरस्वत्यै नमः

श्री गुरुभ्यो नमः

अविघ्नमस्तु

शार्दूलविक्रीडित:-

आधी प्रेमनिधी दयाळ
उद्धी श्रीमारुती चिंतिला
त्याचेनी स्वज्ञान प्रकाश
उदयो सूर्यो जसा भासला ॥ १ ॥

द्रुतविलंबत:- गुणनिधी-उद्घी गणनायका
गणपती विनंती[1] सुखदायका
कविजना करुणाघनबोधका
करि जना रचना मनवेधका ॥ २ ॥

निजगती जगतीं[2] जगतारके
निजमती सुमती सुखकारके
निजबिजे सहजे जगदंबिके
निजकवी करि वो मज अंबिके ॥ ३ ॥

---

१ विनति. २ जगति.

विवर दे वरदे मज सार दे
सुरस दे रसना-रससार दे
भजन दे भवसागरपार दे
वचन दे रचनामततर्क दे ॥ ४ ॥

सदचिदात्मक चिन्मय-आगरु
अचळ चिद्[३]घन-चंद्र-मनोहरू
अपरपार परात्परसागरू

अढळ ब्रह्म[४] सखा मज सद्गुरू ॥ ५ ॥

उपजातिः— पादांबुजें वंदिन सज्जनांचीं[५]
ज्यांचीं[६] मनें सुंदर सूमनाचीं
गिरा वदे रामसुतात्मजाची
कथा बरी सुंदर भारतीची ॥ ६ ॥

भुजगप्रयातः— प्रभू धर्मरायें मही याग केला
इळापाळ सोडी तुरंगोत्तमाला
बरा चंदनें चर्चिला गौरवीला
करी रत्नशृंगार राजा तयाला ॥ ७ ॥

किती शोभती रत्नमाळा विशाळा
मन्याळी गळां किंकिणीकान-मेळा
विराजे मुखीं मोहळे ज्वाळमाळा
तुरा खंजपिच्छी[७] झळाळी निराळा ॥ ८ ॥

तोटकः- बरि हाटकतंतु विचित्र नवी
झम झालरि झूलि दिसे बरवी

---

३ चिघ्न. ४ ब्रंह्म ५ सज्जनांचि. ६ ज्यांचि. ७ पिछी.

किती घागरवेळ रवें रचना
ध्वनि मंजुळ नाद भरे सुचना ॥९॥

द्रुतविलंबित:- जडित हाटकपर्ण विराजलें
अढळ नीडळ त्यावरि बिंबलें
सरस पाखर हेमसुते वरी
जडित हाटकजीन तयावरी ॥१०॥

भुजंगप्रयात:- बरा रंगला चौक मागील जेथें
जडितकोंदणीं पाचि पेरोज तेथें
बरे बिंबले घोसं मुक्ताफळांचे
तसे भार दोहींकडे चामराचे ॥११॥

द्रुतविलंबित:- अचळ चंद्रकळासम बिंबला
अढळ शिळेंबळें बळि तुंबला
परिमळीं कुसुमाकर घोळिला
मघमघीत तुरंगम चांगला ॥१२॥

भुजंगप्रयात:- घळाळीत वाकी पदीं कानभारें
झणत्कारितीं नेपुरें दिव्यसारें
दणाणीत चाले बळें दीर्घ डोले
दिसे इंदु-कांति प्रभा कर्ण काळे ॥१३॥

द्रुतविलंबित:- झळकती भुषणें सम चंद्रिका
विमळ भाळ तुळे वरि पत्रिका
अढळ दोहिंकडे घनघंटिका
अचळ भार सवें कट नेटका ॥१४॥

---

८ भरें. ९ घोश. मुक्तांफळाचे. १० बिंबळा. ११ सिळ. १२ दिव्यें.
१३ भूषणें.

भुजंगप्रयात:– महा भीम भारें मदोन्मत्त दंती
किंकाटे[१४] कटेसी महा भद्रजाती
रथाचीं शतें दाटलीं राजपंथीं
गिरी भीम चाकातळीं चूर्ण होतीं ॥१५॥

प्रमाणिका:– तुरंग रंगले किती असंख्य सैन्य–संपती
बळें बळाढ्य ठाइचे अपार वीर[१५] पाइचे ॥१६॥

भुजंगप्रयात:– कटें दाटली[१६] इंदुनेजें विचित्रें
किती हेमदंडे मनोरम्य छत्रें[१७]
विराजे तसीं चामरें सूर्यपत्रें
किती मत्स्य[१८] हेलावती दंडसूत्रें ॥१७॥

दमामे अगडधोंधिडिम् ढोलें[१९] जंगी
दुंदुभी धमत्कों–धिगिन्कानसंगी
दणाणी धरा भीम नादें नगारे
दुटाळा किती शंख भेरी तुतारे ॥१८॥

शताचीं गनें नीकटें भाट थाटें
ब्रिद्रं बोलतीं नेटेंपाटें[२०] चपेटें
किंकाटें हले नीट वाटे निघोटें
अचाटें, धिटें, काकुळोटें, अलोटें ॥१९॥

प्रमाणिका:– वितंड वीर चेइरे । अखंड दंडिले धिरे
गदा पटीश खेटकें । कटार खर्ग नेटकें ॥२०॥

---

१४ कींकाटें. १५ विर. १६ ईदु. १७ छेत्रें. १८ मत्छ. १९ ढोळ, २० येथें 'न' च्या पुढील एक अक्षर गेलें आहे. पत्रास त्या स्थलीं छिद्र पडलें आहे. यास्तव आम्ही तेथें 'ट' हें अक्षर संदर्भानुसार घातलें आहे.

विबुधाप्रिया:– करुष्णजी अनुशाल्व[२१] अर्जुन विक्रमाजित भूपती
वीर छप्पन[२२] कोटि यादव भूपति किती भारती
भूप ताळक कौंत द्रूपद[२३] शल्य सूरथ पातले
क्षौणि अर्बुद[२४] भूपनायक कौंतळापुर पावले ॥२१॥

भुजंगप्रयात:– पुरीसंनिधी[२५] पातली भीमसेना।
अकस्मात अदृश्य[२६] वारू दिसेना।
किती धुंडिती सैन्यसिंधू[२७] असेना।
किती तर्किती तर्क चित्ती[२८] बसेना ॥२२॥

शार्दूलविक्रीडित:–
नेला अश्व[२९] दुरी किंवा जळचरीं विद्याधरीं किंनरीं
किंवा वारितरीं पहा सरुवरीं नेला खरा आसरीं
ऐसा कोण अरी तुरंगम धरी लोकत्रयाभीतरीं
किंवा त्या असुरीं बळें सुरवरीं नक्तंचरीं[३०] खेचरीं
॥२३॥

आला कोण बळी मदोन्मत
दळीं नेला फणी मंडळीं
किंवा सिंधुजळीं दिशांतरबिळीं
दिग्मंडळीं भूतळीं
किंवा त्या अतळीं, रसातळ–तळीं,
किंवा तळीं सूतळीं
किंवा देवकुळीं पटांत–पटळीं,
विंध्याचळीं पोकळीं ॥२४॥

२१ अनुशल्य. २२ छेपन. २३ दृपद. २४ आर्बुज. २५ संन्निध. २६ आदृश्य. २७ सैन्ये. २८ चिती. २९ अस्व. ३० नग्क्ताचरीं खेचरीं.

चिंतातूर जनी प्रभू निजमनीं तो देखिला लोचनीं
आला देवगुणी श्रीनारदमुनी वीणा करीं घेउनी
साष्टांगी चरणीं शिरोंब्ज[31] धरुनी पार्थे नमस्कारुनी
पूजा रम्यपणीं करी विनवणी बैसोनि सिंहासनीं
॥२५॥

भुजंगप्रयातः- महावीर तो धर्मभूपाळबंधू ।
वदे नारदानें प्रभू वीर्यसिंधू[32] ।
समाचार साकैल्य[33] केला मुनीला ।
असे वर्तला जो अभिप्राय जाला ॥२६॥

उपजातिः- वदे मुनीनायक भूपतीला ।
हें ज्ञान कैसें न कळे तुम्हांला ।
कुळींद्र-भूपात्मज वीर आला ।
वारू बळें घेउनि भूप गेला ॥२७॥

विबुधप्रियाः- कातळापुर पाटनीं विर चंद्रहास्यें[34] महाबळी
तो धनुर्धर जीतिले विर राजराजित भूतळीं
भूपती किति देखिले नैस[35] येकं[36] त्यासम येस्थळीं[37]
ता प्रभू विर धीर नागर वीर्येसागर[38] मंडळीं ॥२८॥

भुजंगप्रयातः- किळाधीपती तात त्याचा भुपाळा
कुळींद्रें पुढें पाळिला पुंण्यशीळा[39]
प्रभू-दुष्टबुंद्धी[40]-सुता हाटकांगी
पहा दीधली चंद्रहास्या करुशांगी ॥२९॥

विबुधप्रियाः- तो प्रभू सुखसार-सागर पार नागर-संपत्ती
धीर गंभिर वीर सुंदर राजराजित भूपती

---

३१ शिराब्जे. ३२ विर्ये. ३३ साकळ्ये. ३४ चद्रहास्ये. ३५ नसे. ३६ यक. ३७ य. ३८ विर्ये. ३९ पुन्येसोळा ४० बुध्दि.

जींनिले नृपती किती क्षिती भूपती बहु मानिती
साधु सज्जन सिद्ध[४१] साधक कीर्तिमंडित[४२] वानिती
॥३०॥

भुजगप्रयात:- किळाधीपती भूपती भूतळींचा।
प्रजापाळ भूपाळ थारा मनीचा
करुणाळु क्रिया कार्य[४३]-कर्ता जनाचा
सुखाब्धी सखा सादरें सज्जनाचा ॥३०॥

द्रुतविलंबित:- कनककांति-कळा प्रभु-कामिनी।
विमळ-नीळ-निळोत्पळ लोचनी
सगुण सुंदर राजित भूषणीं[४४]।
पतिमनोरम-मानस मोहनी ॥३२॥

भुजगप्रयात- प्रवाळाधरा गर्भिणी पूर्ण मासीं
करुणाळू पुढें पुत्र जाला तयेसी[४५]
अती साजिरा बाळ लावण्यधीशा
धरी नांव त्याचें प्रभु चद्रहास्यीं[४६] ॥३३॥

पुढें पुत्र देखोनि राजा विलासे
तनू सर्व सा[४७]मुद्रिकें बिंबलीसे
सुचिन्हीं पदीं पद्म हस्तीं विकासे
सदा इंदिरा इंदु-वक्त्रीं प्रकाशे ॥३४॥

तोटक:- भुपती निज-भाज विलास करी
तनुभिन्न तथासि कधीं न करी

४१ सोल्ह. ४२ किर्ति. ४३ कार्य. ४४ भुशनी. ४५ तयसो. ४६ चंद्र-हास्य, ४७ सामांद्रिकें.

भरलीं वरुषें[48] त्रय त्यासि बरीं
असें[49] खेळत बाळ भुपाळघरीं ॥३५॥

भुजंगप्रयातः- असो ये[50] रितीं भूपती भूमिपाळा
पुढें विघ्न आलें प्रभू पुण्यशीळा
हटेंसीं कटें पातला भूपमेळा
पुरी वेढिली भीमरागे दयाळा ॥३६॥

दळेंसीं बळें पातलें भूपजाळें।
सळें आगळें युद्ध केलें भुपाळें
शरें नीकरें चूर्ण भाळें कपाळें।
शरें भेदितां ढीग जालीं सिसाळें ॥३७॥

प्रमाणिकाः- उरे उरोनि धावरे। मनीं धरूनि हाव रे
विरांत वीर वावरे। कटारमार नावरे ॥३८॥

वितंड दंडिले घिरे। दिखंड खंडिले पुरे
धरी भयासि तो झुरे। देहासि लागले झरे ॥३९॥

रथी तुरंग खंगले। भले न वीर भंगले
रुधीरपूर तुंबले। कितेक वीर भंगले ॥४०॥

किळादि भूपती भला। रणांगणांत भंगला
अपार भार तुंबला। भरें शरीं विचंबला ॥४१॥

बळें भुपाळ संचला। शरीं समोह खोंचला
रणांगणांत वेंचला। विचार तो विसंचला ॥४२॥

---

४८ वरुशे. ४९ असे. ५० य.

भुजगप्रयातः- प्रभूनें किती थोर संतापतापें
रिपू मारिले भीम कोपें प्रतापें
मिळाला महीपाळपाळा विरोधी
प्रभू मारिला युद्धसंधीं[51] किलब्धी ॥४३॥

भयाभीत कंपीत भेणें पळालीं
बळें; बाळ घेऊनि दाया पळाली
निशा भीम, आरण्यपंथें[52] निघाली
त्वरें कौंतळापूर, त्यामाजि आली ॥४४॥

द्रुतविलंबितः- शर सपिच्छ[53] पडे भुप मेदिनी
विकळ प्राण त्यजी[54] रणकंदनीं
सरस सुंदरु वारिजलोचनी[55]
पतिसवें सति होय नितंबिनी ॥४५॥

वसंततिलकाः- सांभाळिने नवरसें करितांचि दाया
त्रीसंबना क्षणभरी तिस बाळमाया
आली अरा निजबळें विकळांग देहीं
जाजावली जिवभयें तिसि शुद्धि[56] नाहीं ॥४६॥

सेजारिणी निजसया सखिया सखीच्या
बोलाविल्या जिवलगा सखिसंगतीच्या
बाळासि घेऊनि पुढें बदली तयांते
हें[57] बाळ कोमळ सये[58] करुं काय यातें ॥४७॥

प्राण-प्रयाण-समयो मज संनिधेसी
हें येकलें सगुण बाळक ये[50] प्रदेसीं

---

५० य. ५१ युध्येसंधि. ५२ अरण्येपथें. ५३ सपिछ. ५४ त्येजि.
५५ वारिजलोचेनी. ५६ सुधि. ५७ हे. ५८ सय.

जाली निरास तुटली निज आस याची
आतां कसी जिवलगे रिति बाळकाची ॥४८॥

तोटकः- मजवीण[59] नसे जनिता जननी
मजवीण नसे सजनी विजनी
मजवीण नसे अवनीं भुवनीं
मजवीण नसे दुसरें सदनीं ॥४९॥

भुजंगप्रयात:- धरूनि करीं बाळकालागि बाळा
सख्यांचे करीं देनसे पुण्यशीळा
करा पूर्ण सांभाळ छाया[60] करुपेत्नी
मनें जाणिजे भूक ताहान याची ॥५०॥

वसंततिलकाः-रामार्पणें सकळ कारण माय कीजे
रामार्पणें भजन भोजन यांसि दीजे
रामार्पणेंचि शयनासन जाणवीजे
रामार्पणें सखि[61] तुम्ही प्रतिपाळ कीजे ॥५१॥

इंद्रवज्रा:- रामार्पणें हेत मनीं धरा वो
रामार्पणें पूर्ण करुपा करा वो
रामार्पणें जीवन यासि द्या वो
रामार्पणें भोजन पूरवा वो ॥५२॥

श्रीराम रामार्पणें बाळ घ्या वो
श्रीराम रामार्पणें खेळवा वो
श्रीराम रामार्पणें बुद्धि द्या वो
श्रीराम रामार्पणें शीकवावो[62] ॥५३॥

५९ यमजविन. ६० छयाया. ६१ सखे. ६२ सीकवा.

भुजंगप्रयात:- सखे तूमचीं जे मनोरम्य[६३] बाळें
तयांमाजि हें रंगलें खेळमेळें
असे गुंतला थोर मायाढिसाळें
उनें घातलें आजि येणें[६४] कपाळं ॥५४॥

प्रमाणिका:- मनीं धरूनि साधना। धरा परार्थ वेदना[६५]।
अपार पुण्य सांचवा। अनाथ बाळ वांचवा ॥५५॥

अपत्य आपुलें जसें। ययासि मानिजे तसें।
अपार लोभ संचवा। अनाथ बाळ वांचवा ॥५६॥

तोटक:- धरुनी निजबाळसखा जठरीं
मृगलोचनि फार विलाप[६६] करी
उठती दुःखसिंधुलता-लहरी
भरली भिम भ्रांति भरो उभरी ॥५७॥

जननीविणें[६७] बालक दीन[६८] जसें
हिन याचक वृत्ति भणंग तसें
जरि मी सदनीं घडि येकि[६९] नसे
सजणी मजलागुनि होय पिसें ॥५८॥

कमनीय वदे सखियासि सखी
पसरी वसनांचळ चंद्रमुखी
परिसा सखि येकि[७०] असे विनती
रसला समजावित जा निगुती ॥५९॥

---

६३ मनोरम्यें. ६४ यणें. ६५ वेधना. ६६ पुण्ये. ६७ विलाफ.
६८ वीन. ६९ दिन. ७० यकि.

भुजंगप्रयातः- सखे जेविती तूमचीं रम्य[७१] बाळें
सुखें सांडिती अन्न जे पुण्य[७२]शीळें
बरें चंद्रहास्यासि द्या सीघ्रकाळें
कृपाळू तुम्हां रक्षिजे मेघनीळें ॥६०॥

उच्छिष्टें सखे तूमच्या बालकांचीं
तयानें हरावी क्षुधा माय याची
अवो माय जीर्णांबरें लेंकुराची
सये द्या तुम्हीं[७३], चंद्रहास्यासि कैंची ॥६१॥

झळंबे[७४] तिची दीर्घ माया सुटेना
बळें तुबला लोभसिंधू फुटेना
भरें मातलें दुःखें[७५] देही विटेना
नृपाळा ! तिला बाळमाया सुटेना ॥६२॥

भ्रमें मातला दुःखोसिंधू सरेना
करी खंति चिंता[७६]नदी वोसरेना
कितीयेकें[७७] आक्रंदली आवरेना
गळाली तनू सर्वथा सावरेना ॥६३॥

तोटकः- वदती मग काय सख्या सखितें
न करू तुझे बाळ जिवापरतें
करूं यासि सभाग्य सखे सरतें
असें हें महिपाळ कळे पुरतें ॥६४॥

---

७१ रम्यें. ७२ पुण्येसीळें. ७३ तुह्मीं. ७४ झळंबे. ७५ दुख.
७६ चींता. ७७ यकि.

वसंततिलका:- त्या बोलती जिवलगा सखि सांडि चिंता
अंतीं मती गति तँशी[78] स्मर राम आतां
वोसावली निज मनीं विकळांग दे या
तात्काळ प्राण तजिला गत बाळमाया ॥६५॥

भुजंगप्रयात:- पुढें बाळ तो येकला दैन्यवाणा
निराश्री निराधार [79]कोणी असेना
मनस्वीं मनें चित्त कोठें बसेना
उदाँसीन[80] त्यालागि दाया दिसेना ॥६६॥

वसंततिलका:- वोसावला मुखशशी न कळेचि काँहीं[81]
चिंतानदी प्रगटली भ्रमनीर डोहीं
दुं[82].खे अपार शिणँला[83] विकळांगदेही
मूँर्च्छीत[84] बाळ पडला रति शुद्धिं[85] नाँहीं[86] ॥६७॥

प्रमाणिका:- स्मरोनि अंतरांतरीं। मुखें म्हणे हरी हरी।
विचित्र कर्मवोवरी। तँयेसि[87] कोण सांवरी ॥६८॥

विचार सौख्य आटलें। अपार दुःखँ[88] दाटलें
विहारकर्म थाटलें। नतेनँ[89] जाय घोटलें ॥६९॥

---

७८ तसी. ७९ कोन्ही. ८० येथें 'उ' अक्षर पाहिजे ते लेखकानें असें चमत्कारिकपणें लिहिलें आहे कीं प्रथमदर्शनी 'नु' वाटतें पण विचारान्तीं 'उ' असें वाचतां येतें. ८१ काही. ८२ दुखें. ८३ सीनला. ८४ मूछीत. ८५ सुद्दि. ८६ नाहीं. ८७ तयसी. ८८ दुख. ८९ नंतिन

भुजंगप्रयातः- बळें मातला दुःखसिंधू सरेना
कळे लोटला लोट तो आवरेना
म्हणे ऊट वेगीं तनू सांवरेना
कदा माय अन्याय आतां करीना ॥७०॥

त्रोटकः- जननी उठ जीवलगे सरिसी
अझुनी नयनीं तुज नीज कैंशी[९०]
कठिणांतर माय क्षणीं कैंरिशी[९१]
विजनीं मज सांडुनि जासि कैंशी ॥७१॥

जननी उठ जीवलगे सजनी
करुणा तुज कैंवि न ये अझुनी
तुजवांचुनि कोण सखी सैंजणी[९२]
मज टाकुनि जातसि कोण वनीं ॥७२॥

द्रुतविलंबितः- न करिसी वचनौंमृत[९३] साउली
तरि कशी करुणाकर माउली
सजणि लोभनदी तुझि आटली
तरि कैंशी करुणाकर माउली ॥७३॥

मज सखे न दिसे तुजवेगळें
विकल काळ क्रैंमीं[९४] तुझिया बळें
जिवसया सखिया तुम्हि या जनीं
जिवलगे निरवी मजलागुनी ॥७४॥

कर धरूनि करीं मज सांवरी
उठ करें मज दे सखियां करीं

---

९० कसी. ९१ करिसी. ९२ सजनी. ९३ वचनांमृत. ९४ क्रमे.

सकळ वीकळ वारिजलोचनी
बहुत शोकभरें भरल्या मनीं ॥७५॥

भुजगप्रयात.- कृशांगी पुढें बाळ घेऊनि बाळा
किनीयेक संबोखिती पुण्यशीळा
उगा रे उगा शोक सांडी कृपाळा
धरी धीर चिंती[95] स्मरे मेघनीळा ॥७६॥

वसततिलका:- जें जें भुमीवरि दिसे तितुकें विनासे
जें जें दिसे मृगजळासम तुल्य भासे
जें जें विधीस करणें सहसा टळेना
जें जें करी हरिसखा परि आकळेना ॥७७॥

प्रमाणिका:- जिवासि जन्मतां[96] जनीं। मुळींच[97] मृत्यु लागुनी।
गुणीच गुंतले गुणी! कितेक भक्षिले मुनी ॥७८॥

जनांत जन्मलें मरे। मरे सवेंच ये[98] धरे
उरोनि ऊरलें उरे। सरे विचार ना सरे ॥७९॥

खचेल ब्रह्मगोळ हा। रचे खचे भुगोळ हा।
सरे विशाळ काळ हा। तसाचि व्याळपाळ हा
॥८०॥

विचित्र चित्र हें दिसे। दिसे दिसोनि ना दिसे
कितेक होत जातसे। विनाश नाश होतसे ॥८१॥

म्हणोनि शोक सांवरी। श्रीराम अंतरीं धरी।
त्यजूनि दुःखवोवरी। अपार खंति सावरी ॥८२॥

---

९५ चीतीं. ९६ जन्मता. ९७ मुळीच. ९८ य.

भुजंगप्रयातः- विवेकें जनीं वोज केली तयांची
किती बोलती रम्यं दाया गुणाची
जयामाजि हे कीर्ति गोविंदजीची
वदे वैखरी रामसुतात्मजाची ॥८३॥

प्रसंग पहिला संपूर्णमस्तु

श्रीरामार्पणमस्तु

---

९९ तयांची. १०० रम्यें.

## प्रसंग दुसरा

भुजंगप्रयात:- मनीं लागली थोर माया तयाची
मनोवृत्ति दुःखिस्त भूपात्मजाची
निराश्री निराधार काया तयाची
जनाला मनीं लागली खंति त्याची ॥ १ ॥

उदासी सदा दुःख देहीं[1] वियोगी
निसंगी विरागी फिरे वीतरागि[2]
असे रंगला बाळ संगी-सयोगीं
मनस्वी[3] जसा योगयोगीं विरागी ॥ २ ॥

बरा लेंकुरामाजि खेळे विदेही
तया नाठवे भूक ताहान कांहीं
किती भोजनालागि नेती तयासी
कितीयेकि अभ्यंगिंती[4] बाळकासी ॥ ३ ॥

मती रंगली लेकुरांमाजि त्याची
उभी ठाकली रम्य रेखा विधीची
तया सांपडे[5] मूर्ति दामोदराची[6]
प्रभू शुद्ध[7] लीला शिळा गंडकीची ॥ ४ ॥

मुखीं घातली चंद्रहास्यें निवांती[8]
सुखें बाळ खेळे पुरीमध्यप्रांतीं
शिळा शुद्ध सामुद्रिके बाह्य अंती
धरोनी मुखीं राहिला तो निवांती ॥ ५ ॥

---

१ देहीं. २ इतरागी. ३ मनस्वी. ४ अभ्यांगति. ५ सापटे.
६ दामोधराची. ७ शुंध, सुद्ध. ८ नींवाती.

वसंततिलका :—बाळा कुरंगनयना सखि हेमकांती
बोलावुनी[9] सुनयना शशिहास्य नेती
अभ्यंग[10] घालिति शशीकळा तयातें
नाना विधी करविती निज भोजनातें ॥ ६ ॥

भुजंगप्रयात:— दिसे लेंकुरांमाजि लावण्यराशीं
विराजे जसा चंद्र तारांगणेंसी
करी रम्य अंभ्यंग आधीं शिळेसी
तया नंतरें आदरें आपणासी ॥ ७ ॥

कितीयेकि त्यातें सख्या खेळवीती
प्रि[11]तीनें किती भोजनालागि नेती
कितीयेकि बाळा तया लाडवीती
किती आपणासन्निधीं नीजवीती ॥ ८ ॥

किती चर्चिती चंदनांगी बाळा
किती घालिती पुष्पमाळा विशाळा
किती आंगिया टोपरीं पुण्यशीळा
किती भूषणें देति बाळा कृपाळा ॥ ९ ॥

प्रवाळाधरा लोकजाया मिळाल्या
तयांला मनीं लागली बाळमाया
किती साजरी सुंदरी बाळकाया
म्हणीं दृष्टि लागेल बाई रुपा या ॥ १० ॥

मुखामाजि ये[12]णें शिळा गंडकीची
असे ठेविली मूर्ति दामोदराची
करी निश्चयें नित्य पूजा तयेची
मनीं लागली भक्ति भावें हरीची ॥ ११ ॥

---

९ बोलाउनी, १० आभ्यांग, ११ प्रतीने, १२ यनें.

करी धूप दीपादि नैवेद्यें[13] आधीं
मनें सूमनांची पुजा सर्व सिद्धी
[14]म्हणे नित्य नामावली रम्य नेमें
हरी करुष्ण गोविंद गोपाळ नामें ॥ १२ ॥

पुढें कांतलाधीश राजा सुबुद्धि
बळें आगळा तुंबला इंदिराब्धी
तयाचे घरीं थोर मंत्री विरोधी
असे नाम त्याचें महा दुष्टबुद्धि ॥ १३ ॥

[15]महोत्सव त्याचे घरीं पुण्यशीळा
किती लोक आमंत्रिले भूमिपाळा
समारंभ आरंभ केला दयाळा
मिळाला सभेसन्निध लोकपाळा ॥ १४ ॥

मिळाले रुषी तापसी योगराशी[16]
महासिद्ध साधु स्वदेशी[16] विदेशी[16]
[17]येती संत सद्भावभावें विलासी
गुणी द्विज पंडीत आरण्यवासी ॥ १५ ॥

पुढें लेकुरांमाजि लावण्यलीळा
असे चंद्रहास्यासवें बाळपाळा
पहा खेळतां देखिले यांसि डोळां
वदे दुष्टबुद्धी अरे पुण्यशीळा ॥ १६ ॥

विराजे मुलांमाजि सौंदर्यसिंधु[18]
जसा रम्य ऊडुगणामाजि[19] इंदु

---

१३ नव्येद. १४ मने. १५ मोहत्साव. १६ योगरासी, स्वदेसी, विदेसी. १७ ईती. १८ सुदर्यसींधु. १९ उडंगनामाजी.

वदे दुष्टबुद्धी[20] तयालागिं मातू
घरीं आमुच्या भोजनालागि ये तूं[21] ॥ १७ ॥

दुतविलंबितः[22]- सजन, संत महंत, मुनी किती
विनटले रुषि, तापस पंगतीं
द्विज मुखें वदती श्रुतिसम्मती
मग तया सखया किती मानिती ॥ १८ ॥

विबुधप्रियाः[23]- यावरी भुपबाळ कोमळ भूवनाप्रतिआणिला
साजिरा सकुमार सुंदर बैसला किती मानिला
देखिला सकळांजनीं जन मानसीं मनिं रंजिला
बोलती सुमती किती गुण सिंधु ते परि रंजला॥१९॥

बैसला मुनिमाजि मंडित चिंतिला हरि अंतरीं
काढिली मुखपंकजांतुनि मूर्ति सुंदर साजिरी
ते शिळा कमनीयशी निळकांति निर्मळ गोजिरी
नव विधा-विधि भक्तिपूर्वक पूजिला श्रीषरि ॥२०॥

भुजंगप्रयातः- अथानंतरें भोजनांतीं सुबुद्धि
विडे दक्षिणा[24] दे तथा दुष्टबुद्धि
पुढें रम्य मंत्राक्षता मंत्रियातें
ऋषी देति तों गुंतला कार्यपंथें ॥ २१ ॥

विबुधाप्रियाः- संनिध शशिहास्य सुंदर बैसला विर धीर्यता
होय भूपति बोलती द्विज घालिती शिरिं[25] अक्षता
पातला मग मंत्रि मानस खोंचलें मुनि बोलतां
कोण कोठिल मेणतां तुम्हि अक्षता शिरिं घालितां
॥ २२ ॥

---

२० दुष्टबुद्धि. २१ य. २२ छेदज्वाळा. २३ तोटकछंद्र. २४ दक्षणा.
२५ सीरीं.

बोलती रुषि, संत सज्जन तापसी मुनि भूपती
बाळ हा विर धीर गंभिर सार सुंदर सूमती
साजिरा लय लक्ष लक्षण लक्षिला गुणसंपती
आमचे मनिं तूमचा सुत अक्षता द्विज घालिती
॥ २३ ॥

भुजंगप्रयात:– करी दुष्टबुद्धी मनीं फार चिंता
[२६]म्हणे बाळ भूपाळ होईल आतां
कधीं हें रुषीवाक्य मेरू ढळेनां
बळें तुंबली ब्रह्मरेखा टळेना ॥ २४ ॥

पुढें शीघ्र पाचारिले पापरूपी
महा दुष्ट चांडाळ काळस्वरूपी
किती जीवहंते क्रियाहीन पापी
सदा तापले तार-संताप-कोपी ॥ २५ ॥

उभे ठाकले ठानमानें कुं[२७]बुद्धि
[२८]जैयांलागि मंत्री म्हणे दुष्टबुद्धि
गिरीकंदरीं बाळ नेऊनि बुद्धि
शिं[२९]रच्छेद याचा करा कार्यसिद्धी ॥ २६ ॥

विराजीत पादांगुली सौ[३०]हवी जे
गृहा आणुनी ते मला दृश्य कीजे
कळेना जनातें तसें कार्य कीजे
तुम्हा हेम देतों मनीं सौख्य माजे ॥ २७ ॥

त्वरा मान खालावुनी मंत्रियातें
त्वरा पातले बाळ गोपाळ जेथें
विराजे बिदीमाजि तो बाळपाळा
दुतीं देखिला बाळ लावण्यलीला ॥ २८ ॥

---

२६ ह्मणें. २२ कुबुधि. २८ जियां. २९ शिरछेद. ३० सांवथि.

विबुधप्रिया:-[23] बोलती दुत मात राजित सुंदरा भुपबाळका
पैल ते गिरिकंदरीं तरु दाट सुंदर वाटिका
लागले वन दाट चंदन त्यांत कांचन कारिका
वेन धामनथाट अंजन चाल तूं सुखदायका ॥२९॥

भुजंगप्रयात:- जळें निर्मळें कूप वापी तटाकें
पिकें चातकें चक्रवाकें वरांकें
कूरंगे मृगें चीतळें खंज मोरें
चकोरें किरें शूकरें आणि व्याघ्रे ॥ ३० ॥

वळीनें वळी पोवळी कांचनाच्या
किती दाटल्या दाटि देवस्थलाच्या
चतुर्भूज मूर्ती शिळा गंडकीच्या
लता लागल्या सर्व देवद्रुमाच्या ॥३१॥

शालिनी:- वोळी वोळी द्राक्ष दाळिंब केळी
केळी केळी कर्पुरा नारिकेळी
पाळी पाळी पोफळी फार पाळी
जाळी जाळी जांभुळी आळमाळी ॥३२॥

द्रुतविलंबत:- किळकिळा किळ कोकिळ कुंजती
रुणझुणा झण षट्पद गुंजती
बकुळ जाइ जुई बट शेवंती[31]
मघमघीत फुलीं फुलल्या किती ॥३३॥

भुजंगप्रयात:- असे रंगला भक्तिभावार्थरंगें
भयाभीत भोळावला भावसंगें
वनांतीं दुतीं आणिला लागवेगें
म्हणे दाखवा देवसद्मे सुरंगें ॥३४॥

---

३१ शेंवंती.

प्रमाणिका:- गिरीकपाट पाटनीं । वितंड वृक्ष दाटणी ।
तमाळ ताळ पीळणी । विशाळ लोळती वनीं ॥३५॥

तरू तमाळ नीकटीं । विशाळ शैलें[32] संकटी ।
सभाग्य बाळ सूमती । विचित्र दूत बोलती ॥३६॥

भुजंगप्रयात:- पुढें काढिल्या शस्त्रवल्ली सभारा
करें नीकरें पूसिल्या खड्गधारा
उभे ठाकले सन्निध शस्त्रपाणी
स्मरे बाळका देव तूझा निदानी ॥३७॥

देहान्तीं मती ते गती होय बाळा
म्हणोनी स्मरे सावळ्या मेघनीळा
महा जाळ जंजाळ माया ढिसाळा
क्षणी गुंतसी तूं भजें विश्वपाळा ॥३८॥

पहा बाळ तो शुद्ध सत्वें विराजे
मुखांतूनि काढी शिळा भक्तिवोजें
पुढें ठेवि पाणीवरी प्रेम माजे
म्हणे तारि वो तारके चित्तरंगें[33] ॥३९॥

प्रमाणिका.- हरी कृपाळ केशवा । मुकुंद इंदुमाधवा ।
दयाळ दीनबांधवा । अनाथनाथ यादवा ॥४०॥

शालिनी:- मेघश्यामा उत्तमा चिद्विलासा
चीदानंदा चिद्घना चित्प्रभासा
सीताकांता अच्युता[35] श्रीअनंता
मातापीता तूं मला बंधु दाता ॥४१॥

---

३२ शैल्ये. ३३ चीतरंगे. ३४ हरुष. ३५ अचुता.

कामदा:- इंदिरावरा सुंदरा हरि भूधरा[37] धरा धारकांतरीं
गोचरापरा भूचरांतरीं श्रीवरा धिरा आगरा वैरी[38]
॥४२॥

पूतनांतका अंतकांतका
अघबकांतका पावणें हरि
विश्वपाळका सौख्य[39]दायका
सज्जनतारका धाव श्रीहरि ॥४३॥

दनुजछेदका, अनुजबोधका,
मनुजवेधका, धांवणेंकरी,
भुवननायका, वचन आइका,
सकळ व्यापका ये वनांतरीं. ॥४४॥

इंदुआनना पंकजानना
दुरितभंजना येकला वनीं
पाव चिद्घना पाव वामना
कल्पनां मना गुंतसी क्षणी ॥४५॥

दुःखकारणा दैत्यदारणा
दासतारणा चिंतितों मनीं
नंदनंदना देववंदना
थोर यातना प्राण-वांटमी ॥४६॥

तोटक:- करुणानिधि आजि करीं करुणा
शरणागत-सौख्य[40]निधी-वरणा
कमनीय कळाब्धि[41] अरीहरणा
इतुकी विनती हरि आणि मना ॥४७॥

---

३६ शार्दूलविक्रीडित. ३७ 'भूदरा' किंवा 'भुवरा' असा हा शब्द दिसतो. ३८ वरीं. ३९ सौख्य. ४० सौख्यनिधि. ४१ कळाब्धि.

भुजंगप्रयातः- उभे सन्नद्ध शस्त्रपाणी निदानीं
निघाला तयाचे मनीं चक्रपाणी
विराजे वनीं बाळ लावण्यखाणी
तयालागुनी बोलती रम्य वाणी ॥४८॥

शार्दूलविक्रीडितः-आतां एक करीं उलंघुनि गिरी
तूं जाय देशांतरीं
आहे ग्राम दुरी विलंब न करीं
बाळा तनू सावरी
टाकीं कौंतपुरी तुझा निज अरी
नांदे पुरीभीतरीं
चित्तीं धीर धरीं भजे नरहरी
बाळा जिवा आवरी ॥४९॥

विबुधप्रियाः- मातले रिस, सिंह, शार्दुळ; भालु
या उलुकें वनीं
व्याघ्र, जंबुक, चीतळे वक्र,
गीध; खंजन, नागिणी
वनम्हैसे, गज, तडस रोहीट,
आसरा, भूत, यक्षिणी
गुंतसी झणि ये वनीं त्वरें जाय
होईल यामिनी ॥५०॥

भुजंगप्रयातः- पुढें छेदिली आंगुळी ते निघाले
त्वरा दुष्टबुद्धिगृहा शीघ्र आले
तया दाविली खूण मंत्री निवाला
धनें कांचनें दे प्रभू फार त्यांला ॥५१॥

---

४२ छेदलंबित' म्हणजे 'द्रुतविलंबित' असें कवि या वृत्ताचें नांव देतो.

चामर + पंचचामर:-

छेदिली पदांगुली वनांत बाळ सांडिला
वनांतरांत येकला अपार शोक मांडिला
विशाळ दु:खसागरू मनांतरांत दाटला
पदांगुळी पटांतरीं रुधीरपूर लोटला ॥५२॥

भुजंगप्रयात:- तरू चंदनाचा पडे चंडवातें
तसा बाळ मूर्छीत तो भूतलींतें
उठे आणि बैसे करी खंति देहीं
बुडाला अकस्मात चिंताप्रवाहीं ॥५३॥

अरण्यांतरीं येकला दैन्यवाणा
वनीं हिंडता मार्ग कोठें सुचेना
तयाला निशी, प्रात, संध्या कळेना
असा बाळ हिंडे वनीं म्लानवाणा ॥५४॥

पंचचामर:- वनातरांत अंतरीं विचार बुद्धि नाठवे
अनाथनाथ श्रीहरी मुकुंदराज आठवे
दयाळ दीन बंधुजी दयाब्धि सोयरा हरि
कृपाळ कृष्ण केसरी त्वरीत धावणें करी ॥५५॥

प्रमाणिका:- गिरीपटांत चामके । तरूकटांत बोचके
वनांत चूकले चुके । सवेंचि तुबले तुके ॥५६॥

मुखांत साजिरी शिळा । स्वभाव भाव आगळा
फिरे वनांत मोकळा । अपूर्व वर्तली लिळा ॥५७॥

कुळींद्र नांव भूपती । असंख्य सैन्यसंपती
मनीं धरून कामना । क्रिडार्थ पातला वना ॥५८॥

कडे कपाट पाटनी । निबीड वृक्ष दाटनी
[४३]कडक ऊठिल्या ध्वनी । तडक श्वापदें वनीं ॥५९॥

वनीं तुरंग रंगले कुरंग ते विरंगले
मदें-रहीत स्वापदें । विवीध टाकितीं पदें ॥६०॥

लपोनी राहिले फणी । विंहंग भंगले[४४] मनीं
कुळींद्र भूपती वनीं । विराजला रथासनीं ॥६१॥

भुजंगप्रयात:- वनीं हिंडतां भूपती पुण्यशीळा
अकस्मात देखे पुढें बाळ डोळां
तनू गोमटी गोर लावण्यलीळा
करी शोक, चित्तीं स्मरे मेघनीळा ॥६२॥

प्रमाणिका:- रथावरूनि ऊतरे । कुळींद्र भूपती हरे
विशेष निश्चयो भरे । निशेष दुःख वोसरे ॥६३॥

विबुधप्रियी[४५]:- साजिरा सकुमार राजस सार सागर सूमती
वीर गंभिर धीर सुंदर राजराजित भूपती
दुर्धरें गिरीकंदरें विवरांतरें वनिं हिंडती
क्रुष्ण केशव विष्णु माधव मानसीं हरि चिंतिती
॥६४॥

शार्दूलविक्रीडित:-

बोले बाळगिरा प्रभू नृपवरा धीरा विरा गंभिरा
नेणें मी दुसरा हरीविण बरा माता पिता सोयरा

४३ 'कडक उठिलया ध्वनी' अशी रचना आहे ती मात्रा वृत्ताप्रमाणे वाटतें. तसें असल्यास कवीनें अक्षरगण वृत्त आणि मात्रागण वृत्त यांचें मिश्रण यांत केलें असें मानावें लागतें ४४ भगलें.

राया स्नेहकरा सभाग्य चतुरा सत्कीर्तिवैरागरा
चित्तीं प्रेम धरा विवेक पसरा आतां स्मरा श्रीवरा
॥६५॥

प्रमाणिकाः- कुळींद्र बैसला रथीं । धुरे वितंड सारथी
सभाग्य बाळ घेतला । त्वरें पुरीस पातला ॥६६॥

स्मरोनि अंतरांतरीं । आनंदला निजांतरीं
भरोनि सौख्यसागरीं । विभंग दुःख वोवरी ॥६७॥

भुजंगप्रयातः- पुरीसंनिधीं[४५] वाटिका सूमनाची
किती दाटली दाटि देवद्रुमाची[४६]
कथा आदरें कीर्ति नारायणाची
वदे वैखरी रामसूतात्मजाची[४७] ॥६८॥

प्रसंग दुसरा कृष्णार्पणमस्तु शुभं भवतु ॥
श्रीराम जयराम जयजयराम
श्रीकृष्णायनमः

---

४५ सनीध. ४६ दृमाची. ४७ रामसुतात्मजाचि.

श्रीगणेशायनमः

# प्रसंग तिसरा

भुजंगप्रयात.—

पुरी सर्व श्रृंगारिली भूपतीनें
पताका गुढ्या तोरणें सूर्यपानें
ध्वजा डंबरें फार छत्रें[1] निशाणें
तुरें वाजती कानकल्लोळमानें. ॥१॥
विदी सज्जल्या रम्य रुंदा त्रिरुंदी
भुमी प्रेमळें धूपिली काचबंदी
वळीनें वळी दीपवोळी निबंदी
चिटीं चित्रिल्या सर्व भिंती सवादी. ॥२॥
शिरीं सुंदरा कुंभ पूर्णोदकेंसी
उभ्या राजसा रम्य लावण्यरासी
किती दीप वोवाळिती भूपतीसी,
किती टाकिती सूमनें सूमनेंसी. ॥३॥
बिदी झाडिल्या काचबंदी विशाळा
सडे चंदनाचे वरी रंगमाळा
किती नाचणी नृत्यरंगीं समेळा
क्रिया सानुसंगीतमाने उमाळा. ॥४॥
ब्रिदें बोलती भाट नेटें चपेटे
उभारूनि पाणि क्रिया कंदू[2] लोटें
हटे भीम लोटे पुरीची सपाटें
पळाले अरीदर्प लोटें अलोटें. ॥५॥
पुढें भूवनामाजि भूपाळ आला
सभामंडपीं मंडनाकार जाला
प्रभू-अंगना रम्य बाळा कृशांगी
त्वरें बाळ वोवाळिती हाटकांगी. ॥६॥

---

१ छेत्रें, २ कदू.

मिळाले रुषी तापसी योगरासी
मुनी मौनें[3] मुद्रा, यँती[4], तीर्थवासी
दिल्हीं भोजनें भूपतीनें तयांसी
विडे दक्षिणा[5] दे प्रभू फार त्यांसी. ॥७॥
द्विजांचे मुखीं घोष होती श्रुतीचे
अशिर्वाद वेदोक्त मंत्रीं रुषीचे
प्रभू जीतिसी भूपती भूतळींचे
शिरीं घालिती भार मंत्राक्षतांचे. ॥८॥
सुखानंद आनंद भूपाळकासी
रसानंद आनंद राजांगनेसी
अपुत्रीं तया पुत्र लावण्यरासी
मनीं मातला सौख्यसिंधू जनासी. ॥९॥
किती याचकें सर्व संतृप्त[6] केलीं
धनेंसी मनें भूवनालागि गेलीं
जनें सज्जनें सोयरीं गौरवीलीं
पुरींचीं जनें सर्व भाग्यासि आलीं. ॥१०॥

प्रमाणिका:—

पडे प्रजन्य साजिरा। अपार पीकली धरा
तरू निबीड चांगले। फळीं फुलीं विरजले. ॥११॥

भुजंगप्रयात:—

जरातीत कांता मनोरम्य बाळा
क्षिरें तुंबल्या वांझ[7] गाई दयाळा
पुराणें, कथा, कीर्तनें धर्मशाळा
मनोरम्य वेदध्वनी होमशाळा. ॥१२॥
जनाला नसे व्याधि रोगादि कांहीं
सभागी सदा लोक आनंद गेहीं

---

३ मौन्य, ४ ईति, ५ दक्षणा ६ संत्रप्ति, ७ वांज,

दिशा दीसती निर्मळा ठाइं ठाइं
कुळींद्राकुळीं दुःख दारिद्र्य नाहीं. ॥१३॥

पुढें शीघ्र बोलाविलें पंडितासि
पढों घातला बाळ लावण्यरासी
मुळीं ॐ नमो सिद्ध आर्धीं सुबुद्धि
मुळारंभ आरंभ ओंकारसिद्धी. ॥१४॥

विबुधप्रिया:-

पंडितीं निट पाटियेवरि ओळि बावन अक्षरें
लेहिलीं रमणीय राजस सार सुंदर नागरें
बैसला भुपबाळ कोमळ वाचिलीं सचराचरें
यामध्यें मज मानलीं द्वय बोलिला नितिउत्तरें. ॥१५॥

प्रमाणिका:-

हकार मानला बरा । बरा रिकार दूसरा
अनेक अक्षरें सरा ।विषम मंत्र हे[11] बरा. ॥१६॥
हरी पहा चराचरीं। हरी स्वयंभ भूचरीं
धरा समीर अंबरीं । हरीच जीवनांतरीं. ॥१७॥

वृत्त:-१ भूतळीं तळीं, स्वर्गमंडळीं
गगनपोकळीं नांद[12]तो हरी. ॥१९॥

कुळि कुळाचळीं फणिफणातळीं
दशदिशाबिळीं सावळा हरी. ॥२०॥

भुजंगप्रयात:-

मुखांबूज[13] स्वर्गाहुनी फार उंचा
तसीं पाउलें सप्त-पाताळ-नीचा

---

८ दारिद्र, ९ कवीनें, या वृत्तास 'तोटक' असें नांव दिलें आहे. १० वोंका-सीधी, ११ ह, १२ नांदतो, (१९ वा आणि २० वा असे दोन्ही श्लोक दोन चरणाचे आहेत) १३ मुखांबुजें,

दिशा[१४] दाटल्या दाटि जाली करांची[१५]
निधी सप्त अब्धी सिमा ऊदराची. ॥२१॥

लताद्रूम[१६] तो भार रोमावळी त्या
किती साजिऱ्या रम्य नाडी नद्या त्या
दिशा कर्ण जिव्हा, क्षुधा[१७] वेदवाणी
पहा चक्षुमंडीत चंद्रार्क दोन्ही. ॥२२॥

तोटकः- हरि तो मजला जनिता जननी
हरि बंधु अनूज सखा सदनीं
कुळदैवत भाग्यनिधी अवनीं
हरि जीवन जीव जनीं विजनीं. ॥२३॥

भुजंगप्रयातः-

असें बोलतां दाटला कंठदेशीं
किती लोटलीं डोळियांमाजि आंसीं
किती सांगती पंत भूपाळकासी
असे रंगला चंद्रहास्ये हरीसी. ॥२४॥

विबुधप्रिया[१८]:

सांगतां सुतमात पंडित भूपती मनिं शंकला
मंडपीं प्रिति बाळकाप्रति काय सत्वर बोलिला
हा तुला कमनीयता हरिछंद कोठुनि लागला ?
तो म्हणे जनिं वीजनीं हरि सर्वव्यापक रंगला. ॥२५॥

भुजंगप्रयातः-

असो यावरी मुंजि केली प्रभूनें
पढों घातला बाळ भूपें प्रितीनें
पहा वेदशास्त्रादि विद्या सुविद्या
त्वरें सर्व अभ्यासिल्या चापविद्या ॥२६॥

---

१४ दिश्या, १५ कराची, १६ लताद्रुमता, १७ क्षुद्रा १८ लंबित

शार्दूलविक्रीडित:—

जालीं अष्ट पुरीं तयासि वरुषें संतोषला भूपती
त्या केलें तप आगळें निजबळें कीं पूजिला श्रीपती
केदारीं सित साधिलें निज तनू त्या घातली करवतीं
केलीं दुर्घट साधनें, द्विजपुजा, पंचाग्नि, तीर्थं किती. ॥ २७ ॥

भुजंगप्रयात:—

किती साधिली शस्त्रविद्या सुविद्या
किती देवविद्या, किती शास्त्रविद्या
गुणी मंत्रविद्या, किती यंत्रविद्या
असंख्यात विद्या, असंभौव्य[19] विद्या. ॥ २८ ॥

द्रुतविलंबित:—

वदत नारद आइक कीरिटी[20]
भजनभक्ति तयाप्रति गोमटी
हरिशिळा वदनांबुज-संपुटीं
अघ हि वारक तारक संकटीं. ॥ २९ ॥

भुजंगप्रयात:—

पुढें भूप राज्यासनीं बैसवीला
सुखें सर्व राणीव आली तयाला
बळें आगळा चंद्रहास्या महीला
करी काय आज्ञा जना सज्जनाला. ॥ ३० ॥

करा रम्य वृंदावनें, धर्मशाळा
सडे चंदनाचे, वरी रंगमाळा
करा देवसद्में, पुजा मेघनीळा
कथा कीर्तनेंसी स्मरा विश्वपाळा. ॥ ३१ ॥

---

१९ असंभाव, २० कीरटी,

करा व्रत येकादशी पूर्ण भावें
व्रतें दान उद्यापनेंसी असावें
शिळा गंडकीच्या पुजा निश्चयेंसी
पुजावे रुषी, तापसी आदरेंसी. ॥ ३२ ॥

प्रमाणिका:-

पुरींत दूत फीरती। जनासि सांगती किती
भजा अखंड श्रीपती। त्यजूनि सर्व-कूमती. ॥ ३३ ॥
विचित्र हे प्रभूगिरा। विचार मानसीं करा
विवेक मादुसें भरा। विकारदेत वीसरा. ॥ ३४ ॥
मनीं धरील विग्रहो। वितंड दंड त्यासि हो
सभाग्य-सिद्ध-साधुहो। येती-महंत-संतहो. ॥ ३५ ॥

भुजंगप्रयात:-

प्रभूची असे भीम आज्ञा करावी
बरी भावना भक्ति चित्तीं धरावी
करुपाळू हरी, कृष्ण नामें स्मरावीं
भवाब्धी-सरी सादरें वोसरावी. ॥ ३६ ॥

प्रमाणिका:-

जनासि मानलें मनीं। कथा अखंड भूवनीं
पुराण-शास्त्र-शोधनीं। कितेक देवसाधनीं. ॥ ३७ ॥

भुजंगप्रयात:-

हरीभूवनीं दीपओळी अपारा
किती लाविती सुंदरा लोकदारा
जनीं बिंबला भावसद्भाव-धारा
धरे लोटला भक्तिसिंधू विचारा. ॥ ३८ ॥
सुमार्गी किती कूप बापी तटाकें
प्रभूनें किती बांधलीं जी अनेकें

किती देवसद्मे सुखानंद मेळे
किती बांधलीं चंद्रहास्यें भुपाळें. ॥ ३९ ॥
असो, नारदें सर्व सांगितलें तें
किती अर्जुनातें मनीं मानलें तें
म्हणे जन्मिचें पुण्यसंचीत होतें
क्रिया याचि ऐसी असे शुद्र चितें. ॥ ४० ॥
कैं मी असा भक्त देखेन डोळां
कैं सांग होईल त्या पुण्यशीळा
प्रणिपात त्या पादपद्मीं दयाळा
कैं सांग होईल आतां कृपाळा. ॥ ४१ ॥
किती भेटले भक्त भावी विलासी
परी चंद्रहास्या महा पुण्यराशी
किती लोटला कीर्तिसिंधू महीसी
पुढें वर्तली ते कथा सांग कैसी ॥ ४२ ॥
कुळींद्रासि येके[२२] दिशीं पुण्यराशी
वदे चंद्रहास्या सभेसन्निधेसीं
मदें मातले भूपती ये महीसी
जिवें जीत जितीन भूपाळकांसी. ॥ ४३ ॥
नृपाळें बळें शीघ्र आज्ञा करावी
उदारें धिरें धैर्यें[२३] शस्त्रें धरावीं
भरें भीम चितानळी वोसरावी
विचारें हरीमूर्ति चित्तीं भजावी. ॥ ४४ ॥

प्रमाणिका:—

प्रभू सुतासि बोलिला। विचार हा नव्हे भला
कसा विवेक मानला। असोनि ठाउकें तुला ॥ ४५ ॥

---

२१ शुधचीते, २२ यकें, २३ धैर्यें,

प्रचंड भूपती किती । बळें वितंड कूमती
[24]असंख्य सैन्यसंपती । बळें बळावले क्षिती. ॥ ४६ ॥

भुजंगप्रयातः-

बळें हीन आम्ही, दळें ही न गेहीं
इळा जीवणें भीम [25]सामर्थ्य नाहीं
महीमंडळीं थोर जाळें [26]भूपांचें
[27]बळें आगळे भीम सिंधू [28]तयांचे. ॥ ४७ ॥
असे कौंतळाधीश [29]क्रोधी कुबुद्धी
दुरात्मा तयाचे घरीं दुष्टबुद्धी
सदा अंतरीं थोर क्रोधी विरोधी
भरें मारिला भीम राजा किलाब्धी. ॥ ४८ ॥
नसे [30]सैन्यं सिंधू पुरीमाजि कांहीं
दुजा भूपती साह्य आम्हांस नाहीं
वदे चंद्रहास्या हरी सर्व ठाईं
सदा [31]साह्य आम्हांस देहीं विदेहीं. ॥ ४९ ॥

प्रमाणिकाः-

जयासि सन्निध हरी। तयासिं मशक अरी
धरा समीर अंबरीं। सखा सभाग्य श्रीहरी. ॥ ५० ॥
असेल अंतरीं बरा। सखा श्रीराम सोयरा
तरीच बोल हा खरा। क्षणांत जिंतितों धरा. ॥ ५१ ॥

भुजंगप्रयातः-

प्रभू चंद्रहास्या म्हणे मंत्रियातें
करा सिद्ध सेना चला राजपंथें
अनुज्ञाप्रमाणें करा सिद्ध सेना
निघाला बळेंसीं बळें वीरराणा. ॥ ५२ ॥

---

२४ असख्ये, २५ सामर्थ, २६ भुपाचें, २७ बळ २८ तयाचे, २९ क्रोधी, ३० शैन्ये, ३१ साहे,

मदें मातले मस्त दंती किंकाटें
कटें चालतीं भद्रजाती चपेटें
अलोटें तशीं लोटलीं अश्वथाटें
रथीं सारथी चक्र वाटें निघोटें ॥ ५३ ॥

प्रमाणिकाः-अपार वीर पांचे । बळें बळाढ्य ठाइंचें
नृपें कुळींद्र वंदिला । निबंद्ध[32] भार चालिला ॥ ५४ ॥

भुजंगप्रयातः-अगड्धों अगड्धों दमामे सुधांगी
धिंडधों धिडिंधों धिडिं ढोल जंगी
दणाणीत धों धों नगारे बुरंगी
धडाडीत धों धों दुंदुंभी[33] सुरंगी ॥५५॥
घनें भेरि घांघांटती शृंग ताळा
कनें काहळा कानपाळा उमाळा
तुहुं तूं तुतारे नभीं अंतराळा
झणाणी झणत्कार घंटा दुटाळा ॥५६॥

प्रमाणिकाः-अपार वीर भूपती । बळेंचि जीतिले किती
विशाळ सैन्यसंपती । निशेषें[34] मंदल्या मती ॥ ५७ ॥
ब्रिदागळे भले भले । अजिक्यें[35] भूप जिंकिले
निमेषें[36] जों मिळे मिळे । बळेंरहीत मोकळे ॥ ५८ ॥

भुजंगप्रयातः-प्रतापें दिपें जिंकिलीं भूपतींचीं
भुमीकोट संख्यासिमा छप्पनाची
किती पैंाटनें[37] दुर्गथाटें महीचीं
पहा जिंतिली सर्व भूमंडळीची ॥ ५९ ॥

---

३२ निबध, ३३ दुंदुभी, ३४ नीशेषे, ३५ अजिंक, ३६ निमिश्ये, ३७ पटनें.

विबुधप्रिया[१] :-जीतिली महि कोटि छप्पन भीम भूवर भंगले
त्यां प्रभू विर धीर गंभिर रुद्र वारहि लागले
आणिले गज लक्ष उन्नत सा शतें रथ रंगले
मीनले नव लक्ष मंडित सज्जले हय चांगले ॥ ६० ।

भुजंगप्रयात :-पहा साजिऱ्या गौर गोमेध खोटी
किती माडुसा तुंबल्या लक्ष-कोटी
हिरे पाचि फेरोज रत्नें विशाळें
निळें मुक्त-माणिक्य तेजें प्रवाळें ॥६१॥
किती शीबिका, चामरें, सूर्यपर्णें
किती मत्स्यछत्रें[३८], विचित्रें निशाणें
किती बाणयंत्र मनोरम्य सारें
पुरी पावला भूपती राजभारें ॥६२॥

प्रमाणिका :-प्रभू कुळींद्र भेटला। मनीं आनंद वाटला
कितीकँ[३९] हर्ष दाटला। मही सुखाब्धि लोटला ॥६३॥

भुजंगप्रयात :-वदे चंद्रहास्या प्रभू भूतळींचे
बळें आगळे वीर्यसिंधू बळाचे
महावीर गंभीर दाते दिनाचे
प्रतापी किती धीर साधू गुणाचे ॥६४॥
प्रभू यांसि आलिंगिजे[४०] प्रेमभावें
बरें यांसि राजोपचारें पुजावें
पुढें भेटला भूपती भूपतींतें
महावीर तो वीर वीरोत्तमातें ॥६५॥

---

१ तोटकछंद. ३८ मछछेत्रें ३९ कितेक ४० आळंगीजे,

किती मानिले पूजिले गौरवीले
प्रभू चंद्रहास्यासि बोलों निघाले
करावी प्रभू काय आज्ञा भुपांतें
प्रिया पुत्र आणूं पुरीमाजि येथें[४१] ॥६६॥

पुढें चंद्रहास्या महीवीरनामा
म्हणे जा सुखें आपुल्या रम्य धामा
असा कल्पनातीत आनंदमेळीं
प्रिर्त नें सदा आमुसीं सर्वकाळीं ॥६७॥

किती चंद्रहास्यें प्रभू गौरवीले
नमस्कारिला भूप तैसे निघाले
प्रभू आपुल्या राजसद्मासि आले
पुढें चंद्रहास्याप्रती तात बोले ॥६८॥

वदे भूप पुत्राप्रती येक दीसीं
वेळीं[४२] कौंतळाधीश राजा महीसी
बळें आगळा पापरूपी कुबुद्धी
दुरात्मा तयाचे घरीं दुष्टबुद्धी ॥६९॥

वसंततिलका :-नामाथिला निजबळें अभिमानराशी
देतों धिरा प्रभुवरा ! करभार त्यासी
तां आणिला धननिधी भिम भूवनासी
द्यावें तयासि उरलें धन आदरेंसी ॥७०॥

---

४१ यथें, ४२ बळे.

भुजंगप्रयातः-वदे चंद्रहास्या प्रभू भूतळींचे
बळें जीतिले वीरसिंधू बळाचे
तयांमाजि तो आगळा काय तेथें ?
क्षणामाजि बांधूनि आणीन येथें ॥७१॥

असे भूप सत्वार्थिला सत्यभावें
म्हणे रे कदा स्वामिद्रोही नसावें
बरें श्रीहरी अंतरीं ओळखावें
सदा सर्वदा भक्तिपंथीं असावें ॥७२॥

किती घेतले भीम दंती तुखारें
रथेंसी रथीं हेमरत्नें अपारें
किती पालख्या, चामरें दिव्यसारें
दमामे दणाणीत भारें सभा रे ॥७३॥

निशाणें किती छत्रमाही विशाळें
कुरंगें, मृगें, कस्तुरीचीं बिडाळें
चिते, चीतळे, श्वापदें, भीमजाळें
खगें, खंजनें, रम्य पक्षी समेळें ॥ ७४ ॥

किती आणखी वस्तभावा अनेकी
किती खेटकें खड्गवल्ली वरांकी
किती बाणयंत्रें तुणी चापखंडें
किती टोपरा, धावळी, दंड बंडें[४३] ॥७५॥

भुपें धाडिलें सर्व भूपाळकाला
तयावेगळे आणखी मंत्रियाला
सवें दीधला नीजमंत्री सयोगी
त्वरा पातला कौंतळापूर वेगीं ॥७६॥

---

४३ बडें.

विराजे सभे कौंतळाधीश जेथें
त्वरा पातले सन्निध वीर तेथें
समाचार साकल्य केला प्रभूतें
भुपें मानिलें, गौरवीलें तयातें ॥७७॥

उठे दुष्टबुद्धी म्हणे भूपतीला
गृहा यासि नेतों प्रभू, भोजनाला
त्वरें भूवनालागि घेऊनि आला.
दिल्हा आणिला भाग जो मंत्रियाला ॥७८॥

उठा जी, म्हणे भोजनाला भुपाळा
त्वरें काय मंत्री म्हणे भूमिपाळा
असे आजि येकादशी पुण्यशीळा
शशीहास्यआज्ञा प्रमाण दयाळा ॥७९॥

कथासार साहित्य हे भारतींची
असे तुंबली श्लोकगंगा गुणाची
जयामाजि हे कीर्ति गोविंदजीची
वदे वैखरी रामसूतात्माजाची ॥८०॥

प्रसंग तिसरा कृष्णार्पणमस्तु

राम राम स्मरसी जरि अंतरीं
अवलिळा तरसी भवसागरीं
ज्याविना न चुकती यमयातना
भज मना हृदयीं रघुनंदना

कृष्णार्पणमस्तु

---

४४ प्रमाने

## प्रसंग चवथा

भुजंगप्रयात:-वदे कौंतळाधीश-मंत्री तयासी
उठा पाक जाला असे भोजनासी
कुळाधीशमंत्री म्हणे मंत्रियासी
अंसे[1] आजि येकादसी[2] निश्चयेसी[3] ॥१॥

वसंततिलका:-आज्ञा समर्थ सुखदायक भूपतीची
त्या चंद्रहास्या विर सुंदराची
येकादसी हरितिथी गुणसागराची
सांगीतिली पुरिजना निज निश्चयाची ॥२॥

भुजंगप्रयात:-करीना पुरीमाजि येकादसीतें
करावें खरारूढ आधीं तयातें
मुखांबूज काळें करी पुण्यशीळा
गळां माळिका पादरक्षा दयाळा ॥३॥

प्रमाणिका:-म्हणोनि पुण्यदायका। विवेकवाक्य[4] आयका
नव्हे विचार हा निका[5]। विकार भोजनें नका ।४।
भुपाळ चंद्रहास्य तो। करुपाळ देवदास तो
कृतांत[6] काळ भासतो। क्षणीं करी विनाश तो ।५।
अभंग भूपतीगिरा। तयेसिं[7] भंग कां करा
विवेक मानसीं धरा। विचार हा नव्हे बरा ॥६॥

उपजाति:- नका करूं आग्रह भोजनातें
मोटा असे विग्रह या जनातें
असे पुढें निर्ग्रह[8] सज्जनातें
ग्रहीं ग्रहो होइल वीजेनातें[9] ॥७॥

---

१. आसे, २. यकादसी, ३. नीश्चयसी, ४. वीवेकवाक्ये, ५. नीका.
६. क्रदांत, ७. तयसि, ८. नीग्रह ९. विजनातें,

भुजंगप्रयातः- कृपाळा प्रभू लक्ष विज्ञापना हे
न मोडूं[10] कदा व्रंत[11] ऐकादसी हे
पुढें दुष्टबुद्धी बळें बोलता हे
तयाला शशी हांस्य[12]चिंत्तीं[13] न साहे ॥८॥

तुम्हां निर्दयी[14] भूप दंडील तेथें
तरी शीघ्र बांधोनि आणीन येथें
कुळींद्रासि ज्यां इंद्र केलें समर्थे
पहा दूत धाडूनि आणूं तयातें ॥९॥

प्रमाणिकाः- दळें बळें प्रचंड मी। करीन खंड खंड मी
अखंड बंडें[15] सागरी। वितंड दंडिले अरी ॥१०॥
अपॅत्य[16] चंद्रहास्य तो। पुरीमधें विराजतो
नव्हे कदा वरिष्ट तो। नृपामधें कनिष्ट तो ॥११॥
प्रभूभयासि वीसरा। अपार धीर्यता धरा
मनीं विवेक वीवॅरा[17]। सुचित भोजनें करा ॥१२॥

उपजाति :- सळें बळें बोलत दुष्टबुद्धि
कुळींद्रमंत्री वदला सुबुद्धि
तो चंद्रहास्या विरराज राणा
सीमा तयाची तुम्हि काय जाणा ॥१३॥

भुजगप्रयातः- जयानें किती थोर संतापतापें
प्रभू जीतिले घोर तापें प्रतापें
भुपेंसीं द्विपें सप्त लावण्य द्वीपें[18]
चळीं कांपती तीव्र दर्पें अमूपें ॥१४॥

---

१०. मोडु, ११. वर्त, १२. शशीहश्ये, १३. चीती, १४. निर्दई,
१५. बड, १६. आपत्य, १७. विवरा, १८. दिपें,

वसंततिलका :-जो आगळा बळनिधी क्षिति तुंबलासे
पृथ्वी समुद्र वलयांकित जिंतलीसे
जे कोटि छप्पन सिमा अवघी विलासे
अक्षा[19] दिसांत अवघा कट बिवलासे ॥१५॥

येतां तुम्हांवरि बळें विरसिंधु तापें
तो वारिला नृपें त्वरें नरराज भूपें
स्वामीद्रोहो मज घडे रणरंगधीरा
तो आमचा निजसखा सुखसिंधुथारा ॥१६॥

[illegible]:- राजा वदे कौंतळमंत्रियातें
पाहा वरू चंपकमालतीतें
जो वीरसिंधू नृप ये महीतें
आर्जीक भूपाळ असे तयातें ॥१७॥

तोटकः- धिरें[20] वीरें[21] विराजित नामसिमा
अजि सुंदर सार मही महिमा
वर सुंदर साधु सखा सुमती
गुणवंत गुणी नृपराज क्षिती ॥१८॥

भुजंगप्रयातः- नमस्कारिला भूप संतोषवीला
त्वरा आपुल्या भूवनालागि आला
करी आदरें सज्ज सेना निघाला
तुरांचा किती क्वान-कल्लोळें[22] जाला ॥१९॥

तोटकः- कमनीय कुमारि[23] घरीं अबळा
विषयीं[24] निज नाम जशी कमळा
वदली वचनें किति पुण्यशिळा
जनकाप्रति कांचनकांतिकळा ॥२०॥

---

१९ अकरा. २०. धीर, २१. विर, २२. कळोळ, २३. कुमारी
२४. विशया,

भुजंगप्रयातः- तरू लाविले भूवनीं भीम जाले
परी व्यर्थ उद्यापनेंवीण गेले
करा कार्यसिद्धी समारंभ वोजे
विचारें वर सादरें साध्यें[२५] कीजे ॥२१॥

असे कन्यिका[२६]वाक्य जाणोनि मंत्री
म्हणे थोर चातुर्यता खंजनेत्रीं
मनीं शंकला चोज अद्‌भूत केलें
म्हणे ईसि सज्ञान तारुण्य आलें ॥२२॥

वरू मानसीं मानला कंठनीळा
परी वीष[२७] कंठीं, गळां रुंडमाळा
शशी भाळदेशीं, गळां व्याळपाळा
सदा भस्म देहीं, सवें भूतमेळा ॥२३॥

महाविष्णुदेही सदा वेषधारी[२८]
नटे मत्स्य[२९]-कच्छादि लीलावतारी
रूपें सिंह, वाराह, तोही भिकारी
घडेना तयालागि देणें कुमारी ॥२४॥

विधी गुंतला पूर्ण ब्रह्मांडकामा
घडी येक येकांत नाहीं रिकामा
सुरंगी सदा गुंतला येमनामा[३०]
तयालागिं द्यावी कैशी[३१] रम्य रामा ॥२५॥

तोटकः- पाहेतां[३२] वर सुंदर इंद्र असे
बहु लोचन त्यासि बरा न दिसे

---

२५. साध्ये, २६, कनिका, २७. विश, २८. वेश, २९. मत्छकछादि, ३०. यमनाना, ३१. कसी, ३२. पाहातां

विषया कमनीय कळा सुरसें
मघवॉ[३३] इस योग्य समान[३४] नसे ॥२६॥

प्रमाणिका:- वरू मयंक चांगला। परी कळंक लागला
रवी मनासि मानला। सदा फिरे विसंचला ॥२७॥
किती भुपाळ पाहिले। परंतु सर्व राहिले
रुपें स्वरूप चांगले। इयेपुढें विरंगले ॥२८॥

भुजंगप्रयॉत[३५]:- प्रभू धुंडिले व्याळ पाताळॅ[३६]वासी
फडे मस्तकीं ते सदा येकदेशी
रुपें आगळी कन्यॅ[३७]का कांचनांगी ॥ ९॥

मालिनी:- वचनवरनिवाडें घातले थोर कोडें
निवळुनि अतिपाडें ईपुढें रूप थोडें
भुमिवर अतिपाडें जोडिले ईसि जोडे
भरुनि गुणनिवाडे बोलिली थोर लाडें ॥३०॥

भुजंगप्रयात:- वदे दुष्टबुद्धि तये कन्यकेसी
करूं आलिया वृक्षउद्यापनासी
विवेकें समाधान केलें तयेचें
म्हणे पूरवूं आर्त ईच्या मनाचे ॥३१॥

निघाला पुढें मर्त्त[३८] मातंगॆ[३९] थाटे
भुमी नृत्यती रम्य वारू फुंकाटे
बळें लोटले पाइचे वीर लोटे
रथी रंगले भीम चाकें निघोटे ॥३२॥

---

३३. मघा, ३४. 'समान' आणि 'नसे' या दोन शद्वांच्यामध्यें शिरोभागीं लेखकानें काकपद दिलें आहे, आणि तद्दर्शक शद्व 'ही' समासांत दिला आहे. वृत्तदृष्टया तो अनवश्यक म्हणून आम्हीं वगळला. ३५. ह्या श्लोकांत तीनच चरण आहेत. ३६. पातळ, ३७. कन्येका, ३८. मत ३९. मातांग,

दळेंसीं[40] बळें दुष्टबुद्धि निघाला
सैंळें[41] नीट चंद्रावतीलागि आला
कुळींद्रें तया मान-सन्मान[42] केला
बरा रत्न सिंहासनीं बैसवीला ॥ ३३ ॥

अथानंतरें दुष्टबुद्धि तयासी
कुळींद्राप्रती बोलिला आदरेंसी
उदेला प्रभू हेत माझ्या[43] मनासी
पहावा तुझा पुत्र लावण्यरासी ॥ ३४ ॥

विबुधप्रिया:- जीतिली महि, कोटि छप्पन भीम भूवर भंगले
जे बळें बळसिंधु तुंबळ भूप भूतळीं तुंबले
रुद्र वासरिं भूपती गिरिकंदरांतुनि आणिले
दावि तो विर केसैरी[44] मज ज्यासि भूवर शंकले ॥ ३५ ॥

भुजंगप्रयात:- नृपें आणिला चंद्रहास्या सुबुद्धि
नमस्कारिला आदरें दुष्टबुद्धि
उभा सन्निधी सत्य-सद्भाव-सिद्धि
जयाचे मनीं दूर गेल्या उपाधी ॥ ३६ ॥

विलोकी तया राजमंत्री भुपाळा
रिपू पूर्विंचा हा मनीं ओळखीला
पदीं देखिलें चिन्ह चित्तीं विराला
म्हणे अंगुलीचा दुतीं छेद केला ॥ ३७ ॥

प्रमाणिका:- नव्हे भुपाळबाळ हा। महा विशाळ काळ हा
बळें बळावला पहा। अपार व्याळ ज्वाळ हा ॥३८॥

द्रुतविलंबित:-[45] विषतरू समुळीं खुडितां बरा
प्रबळ वाढलियां दुख दे विरा

---

४०. दुष्टबुधि, ४१. सलें, ४२. सन्मान ४३. माझा, ४४. केशरी,
४५. कवि ह्या वृत्तास ज्वाला छंद म्हणतो.

करुं उपाय-निधी रिपुसागरा
लवकरी अरि येइल आखरा ॥३९॥

भुजंगप्रयात:- झणीं कौंतळाधीश देखेल यातें
म्हणे हा वरू नेटका मालतीतें
रिपू हाचि होईल राजा मेहीतें[४६] ॥४०॥
मनें घेतली दीर्घ देहीं कुबुद्धि
कुळींद्रात्मजातें म्हणे दुष्टबुद्धि
प्रभू सांगतों ते करा कार्यसिद्धि
गृहा आमुच्या पत्र न्यावें सुबुद्धि ॥४१॥

मालिनी:— नकळत सकळांसी पत्र घेऊनि जावें
मदन तनुज माझा त्यासि नेऊनि द्यावें
त्यजुनि दुसरियातें येकलें स्वार व्हावें
झडकरि लवलाही कार्यसिद्धी करावें ॥४२॥
मदनविण जनासी तूं झणीं दाखवीसी
विजन दुसरियातें पत्रिका वाचवीसी
त्यजुनि जन विदेशी येक येकान्तवासी
झडकरि मजपाशीं ये त्वरें पुण्यराशी ॥४३॥

शार्दूलविक्रीडित :-
स्वस्ति श्रीसुखसागरा, विर धिरा, सद्बुद्धिवैरागरा
धारा वीरवरा, विवेकचतुरा, सारांश-रत्नाकरा
सारासार विचार पार अपरा कार्यार्थ अर्थांतरा
पत्रीं चित्त[४७] भरा, विवेकसभरा, हे कार्यसिद्धी करा ॥४४॥
राजश्री मदना, विवेकसदना, पत्रार्थ आणि मना
केली जे सुचना सभाग्यसघना, सद्गूण- सद्भावना
साधी त्या वचना निर्जीं निजखुणा जाणोनि संसाधना
आतां हे करुणा, सुखें सुखघना, हे कोटि विज्ञापना ॥४५॥

---

४६. ह्या श्लोकांत तीनच चरण आहेत. ४७. चीत्त,

वसंततिलकाः- हा चंद्रशास्य विरराजित धाडिलासे
जाणोनि वृत्ति हृदयीं[48] मज भाम्लासे
सामग्रिकें सरस सुंदर साजलेंसे[49]
जिंतोनि थोर नृपराजि तरंगलासे ॥ ४६ ॥

माझा तनूज जरि तूं, तरि कार्य कीजे
नेऊनि यासि सदना सुख दाखवीजे
चित्तीं धरूनि रचना मन रंजवीजे
साधूनि संधि सदयीं[50] विधें[51] यासि दीजे ॥ ४७ ॥

होसी कुळाब्धि, कुळदीपक, वीर्यसिंधू
सद्बुद्धि, ज्ञाननिधि, नायक, सारसाधू
मूहूर्त वेळ घटिका पाहणें प्रवादू
दे वीष यासि, न करी जननिंद्य खेदू ॥ ४८ ॥

मालिनीः- सकळ सगुणराशी, पत्र आणी मनासी
विसरुनि क्षणि जाशी देखतां या रुपाशीं
नकळत सकळांसी एकें[52] एकांतवासी
धरुनि मद विलासी तूं क्षणीं भ्रांत होसी ॥ ४९ ॥

तोटकः-[53] पाहासी वय-रूप-कुळासि क्षणी
भुलसी कमनीय कळेस मनीं
न कळे तुज मंत्र-कळा-करणी
न करी विवरोनि विचार जनीं ॥ ५० ॥

भुजंगप्रयातः- क्षणीं पूससी बुद्धि कोणासि कांहीं
क्षणीं पाहसी दीन सूदीन कांहीं
क्षणीं गुंतसी कार्यचिंताप्रवाहीं
क्षणीं बूडसी भक्तिभावार्थ-डोहीं ॥ ५१ ॥

---

४८. हृदई, ४९. सजलासे, ५०. सदई, ५१. विश, ५२. यक येकांतवासी
५३. कवि ह्या वृत्तास लंबित म्हणतो.

झणीं भोजनीं चूकसी काळ वेळा
चुके वर्म तांबूलें देतां भुपाळा
दिजे अंबरें ज्यामधें हेमकीला
भरे त्यांत भांबावेंसी पुण्यशीळा ॥५२॥

करी मंचकीं रम्यता सूमनांची
झळंचे झणीं भ्रांति शय्यां सुखाची
घडीनें घडी साध्य कीजे तृपेची
सिमा आठवी सादरें पत्रिकेची ॥५३॥

धरी अंतरीं तर्क अभ्यंग ठायीं
गुणें गुंतसी व्यर्थ मायाप्रवाहीं
सुखें वेंचितां द्रव्यें संदेह नाहीं
करी सोहळा तूं सुखानंद गेहीं ॥५४॥

प्रमाणिका :-पहा सखा भुपाळ हा। पुढें कठीण काळ हा
बहू मनीं दयाळ हा। असे नृपाळबाळ हा ॥५५॥

गुजासि मानसी कुडें। पुढें तुलाचि सांकडें
विवेक नेणिजे मुढें। विचारि अक्षरें जडें ॥५६॥

वृत्त :-?
काळ वेळ विलंब झणीं करा
विषतरू समुळीं खुडितां बरा
झणि मनीं धरिसी भवमेदरा
तरि अरी प्रलयांत करी दुसरा ॥५७॥

द्रुतविलंबित :-[६०]
विसरिशी सरिसी दिनयामिनी
विसरशी शयनीं, भुवनीं, वनीं
विसरिशी, करिशी करुणा झणीं
विसरसी, मुकसी सुखसाधनीं ॥५८॥

---

५४. तांबोल, ५५. भावावसी, ५६. शैया ५७. त्रृशेची, ५८. वेर्थ, ५९. द्रव्ये, ६०. कवीनें, ह्या वृत्तास प्रमाणिका म्हटलें आहे. ६१. सादनी.

पंचचामरें :- अपार-पार पत्रिका, विचार आणिजे मना
विरा विरोनि वीवरा भविष्य-भूत-भावना
भरा भरोनि अक्षरा, करा स्वहीतशोधना
सभाग्यसागरा गरा घरा मनांत वेध ना ॥५९॥
क्षणीं विलंब लाविशी। मनीं अनेक भाविसी
स·ोभ लोभ दाविशी। रुपीं ममत्व गोंविशी ॥६०॥

भुजंगप्रयात :- उभा सन्निध चंद्रहास्या सुबुद्धि
क·ीं पत्रिका देतसे दुष्टबुद्धि
म्हणे वीर वीरोत्तमा भूमिपाळा
घरा आमुच्या जाय वेगीं दयाळा ॥६१॥
असे आमचा पुत्र लावण्यखाणी
गुणाचा, रतीनाथ नामाभिधानी
प्रभू त्यास भेटोनि यकांत-धामीं
करीं पत्रिका दे, तुला सांगतों मी ॥६२॥
सखे, बंधु, माता, पिता सज्जनातें
भुपाळा क्षणीं दाविशी पत्र त्यातें
न द्यावें कदा आणखी संगतीतें
प्रभू यकला जाय तूं कौंतळेतें ॥६३॥
कृपाळा क्षणीं दाविसीं पत्र गेहीं
तुझें कार्य नासेल संदेह नाहीं
क्षणीं गुंतसी व्यर्थ मायाप्रवाहीं
सुखें यकला जाय यकांत गेहीं ॥६४॥
प्रभू यकलें कौंतळालागि जावें
सुखें पत्रिका-कार्यसिद्धि करावें
करीं पत्रिका दीधली तोषवीला
कवी रामसूतात्मजें ग्रंथ केला. ॥६५॥

प्रसंग चवथा संपूर्णमस्तु

---

६२. कवि ह्या वृत्तास शार्दूळ छंद म्हणतो,

# प्रसंग पांचवा

भुजंगप्रयात :– नमस्कारिला दुष्टबुद्धि, निघाला
प्रभू चंद्रहास्या गृहालागि आला
बरे वंदिले तात, माता तयांला
समाचार साकल्य सन्नीध केला ॥ १ ॥

प्रमाणिका[1]:–वदे नरेंद्र नागरा । प्रभू विवेकसागरा
निमित्य जासि कां विरा । सभाग्य कौंतळापुरा ॥२॥

भुजंगप्रयात :– म्हणे कौंतळाधीश-मंत्री सुतासी
दिजे पत्रिका यक यकांतवासीं
कळेना कळा गुप्त गुह्यार्थ कांहीं
मला पत्रिकेची रती चाड नाहीं ॥ ३ ॥
वदे माय मेघावती भूपजाया
झळंबे सुताची मनीं थोर माया
मनामाजि वोसावली पंकजाक्षी
त्वरां लोटली लोचनामाजि आंसीं ॥ ४ ॥
बुडाली अकस्मात चिंता-प्रवाहीं
मनीं फार जाजावली भ्रांतिडोहीं
स्मरेना मना कामना कार्य कांहीं
पडे भ्रांति, वेडावली, भूलि देहीं ॥ ५ ॥

पंचचामरः– निमित्य काय पाठवी प्रधान कौंतळापुरा
करूं विचार काय मी, वदे नृपाळ नागरा
तथापि येक येकला, नसे सुसंग दूसरा
करील काय नाकळे,हरी कृपाळ सोयरा ॥६॥
विचित्र कर्म शेवरीं । तयेसि[2] हे भरोवरी
सखा कृपाळ श्रीहरी । तयेसि तोचि आवरी ॥ ७ ॥

---

१. कवि ह्या वृत्तास प्रमाणिका छंद म्हणतो, सातव्या आणि आठव्या श्लोकाचेंहि वृत्त हेंच आहे. २. तयसी,

मनासि चीज वाटलें। कसें अकर्म थाटलें ?
अपार दुःख वाटलें। न जाय आजि घोटलें ॥ ८ ॥

तोटक :- मग वंदुनि इंदु, पिता जननी
वदला कमनीय गिरा वचनीं
सगळा सुखसिंधु भरा सदनीं
क्षणि दुःखकळेसि धराल मनीं ॥९॥

असतां व्रजपाळ कृपाळ शिरीं
दिन किंकर काळ, भुपाळ, अरी
यदुनाथ अनाथ कदा न करी
धारली जननी जनिता जठरीं ॥१०॥

भुजंगप्रयात :- नमस्कारिलीं तात-माता निघाला
प्रभू चंद्रहास्या हयारूढ झाला
हरी, कृष्ण, गोविंद उच्चार केला
प्रदेशीं पुरीसन्निधीं शीघ्र आला ॥११॥

प्रभू बाह्य रम्य स्थळें पुण्यशीळा
वनें, काननें देखिलीं भव्य डोळां
भरें दाटल्या वृक्षवल्ली विशाळा
फुलि फुलें लागलीं अंतराळा ॥१२॥

जळें तुंबलीं कूप, वापी, तटाकें
किती चक्रवाकें बकें आणि पीकें
किती पक्षिनी रंग सुरंग रंगें
बरी भृंग झेंपावती अंगसंगें ॥१३॥

तरू थाटले दाट देव-द्रुमांचे
बरी घोंस हेलावती सुमनांचे

---

३. उच्चार, ४. भव्य, ५, ह्या श्लोकांत दुसऱ्या आणि तिसऱ्या चरणांच्या मध्यें पुढील रचना आहे. 'कोडा खंज द्राक्षें'. ६. द्रुमाचे, ७. घोस,

झळाळीत शोभा जसे हाटकाचे
मिळाले तसे भार विद्युल्लताचे ॥१४॥

तोटक :- नभचुंबित उंच सिमा सरळे
किति हाटकवर्ण तनू पिवळे
हिरवे किति कोमल बाललिळे
दिसती तरु, वेणु बरे सरळे ॥१५॥

सुमनें पित-रंग सुरंग किती
निळे, शुभ्र, आरक्त सिमा दिसती
किति कांचनकांति कळे सरती
वरि षट्पद कुंज सुखें करिती ॥१६॥

विबुधप्रिया[13] :- ताळ, माळ, तमाळ[14] फापटी सिरनाटिका
चूत, चंपक, पारियातक, केकती, करवंदिका,
रक्तचंदन, सादधामन, सेवगे, निरगुंडिका[15]
वेन, आंजन, खैर, कांचन, वेळु, हिंगण, कारिका ॥१७॥

द्रुतविलंबित[16] :- तरुवरी किळ कोकिळ कुंजती
परम मंजुळ पंचम रंजती
मधुर गुंजन षट्पद गुंजती
धुसर धूळिपराग विराजती ॥१८॥

भुजंगप्रयात :- गिरा बोलती चातकें, चक्रवाकें
पिकें रंजलीं रम्य शब्दे वरांकें
बकें, सारसें सुंदरें काक, ठोकें
शुकें[17], सारिका सार शब्दीं मयंकें ॥१९॥

---

८. हटकाचे, ९. उंच्च, १०. नीळ ११. आरक्त, १२. सीमा, १३. कवीनें ह्या वृत्ताचें नांव दिलें नाहीं. येथील शद्ब नीट लागत नाहीं. तो "दलः" असा दिसतो. १५. निरगुडीका १६. कवीनें दिलेलें नांव माळनी छंद, १७. सुकें,

वनीं नृत्यतीं नृत्यरंगी मयोरें
किती पिच्छ पिंजारती निर्विकारें
स्वरें बोलतीं तीतरें कीर सारें
वनीं मातला कान मंजूळ-भारें ॥२०॥
किती भार आपार त्या श्वापदांचे[१८]
वनीं वागती थोर थोंवे मृगाचे
जळें तुंबले तुंब वापीजळाचे
किती चालती पाट रम्योदकाचे ॥२१॥
तरू केशराचे सुगंधीत गंधें
निळीं, पीत, आरक्त, शुभ्रें कुंमूदें[१९]
वनीं पातला चंद्रहास्या आनंदें
असे रंगला आत्मवादें प्रवादें ॥२२॥

मालिनी :- सरुवर निरासिंधू साजिऱ्या भव्य पाळीं
तरुवर सुमनांचे दाटल्या दाट वोळी
परम सितळ छाया[२०] शोभली भू समेळीं
नृपवर वनिं आला भीम मांध्यान्ह[२१] काळीं ॥२३॥
तटाकातिरीं रम्य छाया[२०] द्रुमाची
मनोवृत्ति आनंदली भूपतीची
प्रभू ऊतरे चंद्रहास्या महीतें
तमाळासि बांधे तुरंगोत्तमांतें[२२] ॥२४॥

द्रुतविलंबित[१६] :- सरस सुंदर वारि विराजलें
विमळ दोहिं तटीं निर तुंबलें
अति मनोहर मानस रंगलें
स्फटिकें[२३]बद्ध दिसे निर चांगलें ॥२५॥

---

१८. श्वापदांचे १९ शुभ्रेंमुकुदें, २०. छायाया २१ माध्यान
२२. तुरंगोतमातें २३. बद्

वसंततिलका[24] :-प्रक्षाळिले वदनपंकज, पाद, पाणी
केली पुजा सहज सन्निध चक्रपाणी
जाला बरा दश शेतें[25] जप भक्तिभावें
गोपाळ-कृष्ण-हरि-केशव-रामनामें ॥२६॥

भुजंगप्रयात :- झळंबे मनीं लोभ मेधावतीतें
सर्वे दीधलें रम्य पक्वान्न होतें
तटाकातिरीं सारिलें भोजनातें
प्रभू पातला रम्य छांया[26] महीतें ॥२७॥

श्रमैाच्या[27] गुणें ठाकला शीर्ण देहीं
निजेला मही भूपती शुध्दि नाहीं
सुशुप्तीभरें[28] नाठवे त्यासि कांहीं
असे रंगला भीमनिद्राप्रवाहीं ॥२८॥

विबुधप्रिया[29] :- कौतळेश्वरकन्यका कमनीय चंपकमालती
तीसवें शतपंच राजित साजिऱ्या सखि सूमनी
रम्य, हाटक-कांति, कोमळ, डोळसा किनि चालती
पातल्या वनवाटिका कमळानना सखि खेळती ॥२९॥

भुजंगप्रयात :- सवें दुष्टबुध्दीसुता हाटकांगी
असे वीषैया[31] नाम बाळा कृशांगी
शतें पंच सांगातिणी हेमअंगी
कुमारी वना पातली लागवेगी ॥३०॥

तोटक[30]:- पुजिती निजगौरि विलासकळा
खुडिती कमळें सखिया सकळा

---

२४. कवीनें ह्या वृत्ताचें नांव दिलें नाहीं. २५. शेत, २६. पक्वान, २७ श्रेमाच्या, २८. सीन, २९. शुशुप्तो, ३०. कवीनें दिलेलें नांव लंबित छंद. ३१. विशया,

करिती कमनीय कळा विमळा
करिती कौतूक[32]-कळा सकळा ॥३१॥
सकळा सखि जीवलगा सखिया
मुखरीण क्षितीपाळ प्रभु तनया
महिपाळ-प्रधान-सुता विषया ॥३२॥*

शार्दूलविक्रीडित:-

यकी त्या सुमनें भरूनि विमनें यकीवरी टाकिती
यकी हेमकळा धरूनि अबळा चैलांचला चोढिती
यकी त्या चतुरा विलास सघरा माळा गळां घालिती
यकी यांके करीं धरूनि पदरीं नाना खुणा दाविती ॥३३॥
यकी चंदन चर्चिती सुनयना गोरिहगालगुनी
यकी त्या कळिका वसंततिलका लावोलिया सूमनी
यकी कुंकुम केशरें करवरें भूसिपती आगनीं
यकी कस्तुरिका फणींद्रतिलका श्रृंगारिती योगिनी[33] ॥३४॥

भुजंगप्रयात :- किती सज्जनी[34] अंबरें सूमनांचीं
किती गुंफिती कंचुकी चंपकाची
किती वेंचिती सूमने मालतीचीं
किती घालती पुष्पवेणी सखीची ॥३५॥
तरूचीं फळें तोडिती यकि बाळा
किती देति घेती सया पुण्यशीळा
किती सज्जिती सत्य शैया फुलाच्या
किती घेति निद्रा सया संगतीच्या ॥३६॥

तोटकैः:- उभिया तळिं यकि तरूनिकटीं
बरुत्या किति राजित सिंहकैटी[36]

---

३२. कवतुक. *३२ व्या श्लोकाचे तीन चरणच उपलब्ध आहेत. ३३. योगीनी, ३४. सजती, ३५. कवि ह्या वृत्तास लंबित म्हणतो. ३६. सींहघकटी,

फळभार अपार बरा तजिती
किति संगित गीतकळा वदती ॥३७॥

भुजगप्रयात :- स्वरें सुस्वरें सार साहित्य रंगें
स्वरें प्रमान सारंग कल्याण रागें
किती मानसा मोहिनी पंचमागें
भरें भावना घेति यकी सुरंगें ॥३८॥
सख्या बोलती येकमेकींस तेथें
चला गे सय तुंबलें नीर जेथें
किती टाकला शीण देहीं विराला
त्वरेनें जळासन्निध शीघ्र आल्या ॥३९॥

द्रुतविलंबित :- सरस साजिंत[३७] सुंदर चांगलें
सुरस वारि विराजित रंगलें
कमळिणी[३८]कमळीं जळ बिंबलें
निकट अंबुधिसे[३९] तट तुंबले ॥४०॥

तोटक :- वसनें तिरिं ठेवुंनि[४०] हेमकळा
करिती जळखेळ सया सकळा
खुडिती कमळें कमनीय-कळा
किति घालिति चंपकमाळ गळां ॥४१॥
तजिती[४१] जळ यक मुखावरुतें
दुसऱ्या[४२] स्वकरें करिती परतें
किति लेपिति पंक करें तनुतें
जळखेळ विलास सुखें समतें ॥४२॥
किति बाहिरि यति सख्या सुमति
वसनें परिधान सुखें करिती

---

३७. सजीत, ३८. कळनीकमळी, ३९. अंबुदिसे ४० अक्षर मागें पुढे झालें आहे. ४१ ह्याचा उच्चार 'त्यजती' असा आहे. ४२ 'दुसऱ्या' असा शब्द पडला आहे.

सकळा सखि सिंधुसिता पुजिती
किति हाट-ककांतिकळा निगुती ॥४३॥

भुजंगप्रयात :- तटाकातटीं दाटि देवद्रुमाची
मनोरम्य छाँया[४३] दिसे पादपांची
सुगंधीत गंधे फुलें चंपकाचीं
जुई-मोगरे-शेवती-मालतीचीं ॥४४॥

निजेला तनू गौर लावण्यरूपी
दिसे साजिरा वीर धीर प्रतापी
जसा नोवरा काय केळावलासे
सयाचे मनीं तेपरी भूप भासे ॥४५॥

द्रुतविलंबित :- परि तया विषया[४४] मृगलोचनी
रुपवती सुमती रतली मनीं
हिमकळा अबळा गजगामिनी
लिगटली नटली वनयोगिनी[४५] ॥४६॥

भुजंगप्रयात :- अवस्था[४६] मनीं लागली आवरेना
गळाली तनू सर्वथा सांवरेना
मनीं लागली खंति कांहीं सुचेना
सया बोलती बोलें[४७] चित्तीं[४८] रुचेना ॥४७॥

उभ्या सुंदरा सन्निध कांचनांगी
क्तिती बोलती कोण लावण्य अंगीं
कळेना कसें भूप कीं देवयोगी
निघाल्या फुलालोंगि[४९] वेगी कृशांगी ॥४८॥

---

४३ छयाया. ४४ विशया. ४५ वनयौगीनी. ४६ अवस्ता. ४७ यांतील 'ति बोल' हीं अक्षरें समासांत शिरोभागीं आहेत. ४८ चीतंी. ४९ यांतील 'ला' अक्षर समासांत आहे.

तोटकः- वदती विषयेसि सया सकळा
तुज कां सरली विकळांगकळा
चित चंचल स्वेद दिसे कमळा
विगलीत तनू म्हणती अबळा ॥४९॥
सजणी तुझे चित्त दुचित्त दिसे
स्थिर मानस एक रती न दिसे
निडलावरि स्वेद विलासतसे
रुळतो वसनांचळ कां सुरसे ॥५०॥
नयनांतुनि नीरझरे सुटले
उदधीजळतुंच तसे फुटले
निरिबंद निबंद कसे चळले
गति मंद पदं तुज कां वळले ? ॥५१॥
पुसती सकुमार सया सखिया
वदली सखियांसि सखी विषया
करिता तुम्ही माय किती रळिया
सकळा सदनाप्रति पावलिया ॥५२॥
मालिनीः- तदुपरि विषयावें चित चिंताप्रवाही
विपरित गति तयची लागली खंति देही
भुमिवर निजरूपीं नाठवे तीसि कांहीं
म्हणवुनि सजणी ते मानसीं शुद्ध नाहीं ॥५३॥
प्रमाणिकाः-महा उदार धीर तो। बळें बळाढ्य वीर तो
दिसेल कीं दिसेल तो। असेल कीं नसेल तो? ॥५४॥
रूपीं विराजमान तो। नव्हे प्रभूसमान तो
वनांतरीं विराजतो। महाधिराज राजतो ॥५५॥
स्वरूप-साजिराचि तो। प्रभूंत नोवराचि तो
सगूण गोजिराचि तो। मनांतरांत राजतो ॥५६॥

---

५० चीतदुचीत. ५१ वसनाचळ,

भुजंगप्रयात :- चुकावूनि त्या सुंदरा हेमअंगी
वना पातली लागवेगें करुशांगी
क्षणीं देखती सुंदरा हाटकांगी
तरी लाज मोटी म्हणे कांचनांगी ॥५७॥

मालिनी:- नपुसत (सं)स्त्रियांतें यकली केवि गेली ?
विजनवन करणें।ची भूडली भ्रांति जाली ?
सरसैंतटिं निजेला काय त्यातें मिळाली ?
सकळ वदति तेव्हां लाज वोंशासि आली ॥५८॥

शार्दूलविक्रीडित.-यखादी सजणी सरोजनयनी त्यासंनिध यकली,
चिंतीं तो भगला, असेल वरिला, त्याचे तुकें तूकली,
किंवा अंबुतटीं सखी करुशकटी कोणही तऱ्ही चूकली ?
आतां काय करूं ! किती जिव धरूं ! आशानदी सूकली ॥५९॥

तोटक:- भरलें वनिं कामपिसें विलसें
मदनांकित देह विराजितसे
अवघें वनभूवन हिंडतसे
भ्रम-भूलिभरें महि धुंडितसे ॥६०॥

प्रमाणिका:-भ्रमीत यकली वनीं। वनांतरांत कामिनी
श्रमीत खंजलोचनी। निशेष मंदली मनीं ॥६१॥
वनांतरांत अंतरीं। स्मरोनि सावळा हरि
किती वियोग वोवरी। मनें करूनि आवरी ॥६२॥

---

५२ ही रचना 'नपुसतस्रीयातें' अशी आहे हींत 'स' आणि 'त' वर दोन आणि एक असे अंक लेखकानें घातले आहेत, तरी 'स' हें एक अक्षर संदर्भ ध्यानी घेतां उणें पडतें तें मी घातलें आहे. ५३ 'व' हें अक्षर समासांत आहे. ५४ हें पद 'समरस' असें आहे यांत 'म' हें अक्षर वृत्त नि अर्थ दृष्टया अधिक दिसतें म्हणून मी वगळलें. ५५ 'चीतो, असा हा शब्द मुळांत आहे. हा सारा चरण समासांत लिहिलेला आहे. ५६ 'श्रिमीत'.

भुजंगप्रयात :- तटाकातिरीं भूप होता निजेला
कळेना कसे स्थीर कीं दूरि गेला.
करि तर्क वीतर्क चित्तीं तयाला
तटाकीं तुरंगोत्तमें हींस केला. ॥६३॥

प्रमाणिका :-मंद मंद पाउलीं। तटाकपाळि पावली
समीप फार पातली। तनू तयासि रातली ॥६४॥

भुजंगप्रयात :- मनीं आणखी यक्कि चिंता सखीची,
निवारें ह्मणीं वोसरे नीज याची
शरीराकृती साजिरी लक्षणाची
तनू सर्व लक्षीन या भूपतीची. ॥६५॥

प्रभूसंन्निधसीं[५७] उभी राहिलीसे
वपू लक्षितां दिव्यें तेजें विकासे
तनू सर्व सामुद्रिकें[५८] बिंबलीसे
मनीं बैसली मूर्ति बाळा विलासे ॥६६॥

धिर गंभिर वीर उदार कळा
तनु संगित सिद्ध[५९] सभाग्य लिळा
सुखसिंधु गुणी गुणवंत शिळा
लय लक्ष कळा अचळा सकळा ॥६७॥

कसा साजिरा वीर वीरोत्तमाचा
महाराज लावण्य दीपांतरींचा
विराजे जसा रत्न वैरागरीचा
भुपामाजि हा भूपती भूतळींचा ॥६८॥

तोटक :- वदले भुवनीं पितियासि तई[६०]
धरिला निजहेत असे हृदयीं[६१]

---

५७ संन्नीधसंी ५८ सामोद्रिकें ५९ सीध सभाग्ये ६० तें. ६१ ऱ्हुदई

मम वाक्यनिधी मनिं आठविला
सदना वर सुंदर पाठविला ॥६९॥

पंचचामर+चामर:-

करी विचार अंतरीं सभाग्य पुण्यदायका
विचित्र अंबरांचळीं विराजमान पत्रिका
देखतांचि पातली कलाकल्लोळ व्यापका
सोडिली हळूचि ते चरित्र चित्तशोधका ॥७०॥

भुजगप्रयात :-तरूआड राहोनि ते वाचिताहे
वरी अक्षरी अक्षरें शोधिताहे
पुढें अर्थ अर्थांतरें पत्रिकेचीं
वदे वैखरी रामसुतात्मजाची ॥७१॥

प्रसंग पांचवा संपूर्णमस्तु

---

# प्रसंग सहावा

शार्दूलविक्रीडित

स्वस्ति श्री मदना, विवेकसदना, सद्बुद्धि सुलक्षणा
राजश्री सगुणा सकाम सुचना पत्रार्थे आणी मना;
भ्रांतीची रचना त्यजूनि सघना पत्रीं असे साधना
साधी त्या वचना सुखें सुखघना हे कोटि विज्ञापना ॥१॥
यकांतीं विनती करी निजगती पत्रांतरीं वित्पति
अर्थीं अर्थ किती त्यजूनि कुमती घे अर्थिंची संपती
वाचावी निगुती सभाग्य सुमती जाणोनि पत्रस्थिति
चिंती प्रेम प्रितीकरूनि सरती हे वीनती संवृती ॥२॥

---

१ " करिनीजगतीपत्रांतरीविप्तति ॥ आ ' ' एवढी रचना समासाच्या डाव्या भागास असून उजव्या भागास त्याच्या पुढील ' र्थीआर्थकिती " अशी रचना आहे. २ अर्थीची.

वसंततिलकाः-तूं आगळा गुणनिधी धिर वीर नामें
चातुर्थसिंधु सुमती सकळा कळानें
पत्रीं पदार्थ सुचना लिखितार्थ घेणें
साधूनि वेळ सदनीं विष यासि देणें ॥३॥

द्रुतविलंबितः-यॉर्ती कुळ रचना न करीं मनीं
वय-रुपा स्वरुपा पाहासी क्षणीं
विमळ शीळ कळा कमळो गुणो
बुधजना सजणा पुससी क्षणी ॥४॥

भुजंगप्रयात :-तटाकातटीं नीकटीं हाटकांगी
मृगांबाननी पत्र वाची वरुशांगी
सुअर्थी असे अर्थ पत्रांग अंगी
सुरंगी दिसे रंगरंगी सुरंगी ॥५॥

विबुधप्रियाः-वोळखे धिर तात-अक्षर सार सादर पत्रिका
धाडिला नृपराजें हा वर धीर सुंदर नेटका
देखतां मन लोभलें[६] रमणीय राजस नायका
मानलें मज माय योगिनि[७] पावली जगदंबिका ॥६॥

प्रमाणिकाः-परंतु लीहिलें कसें। असोनि हें अनारिसें
दिसे विचित्र चित्रसें। पवित्र पत्र कायसें ॥७॥

इंद्रवज्राः-
कीं चूकलें अक्षर भ्रांतिमात्रें। पत्रीं दिसे कीं विष[८] यासि द्यावें
हे बंधुगायास पडेल टात्रें। यावीष देतां मग क्या मरात्रें ॥८॥
पत्रीं कसें विप्रित लेखकानें। कां लेहिलेसे विष यासि देणें
कीं चूकलें अक्षर भाळऊनें। करुं कसी मी मति बुद्धि नेणें ॥९॥

---

३ या वृत्तानें नांव लेखकानें इंद्रवज्रा छंद ' असें दिलें आहे ४ हृया दोन चरणांची रचना विचारार्ह आहे. ५ हा शब्द समासांत आहे. ६ लोभलें. ७ योगीनी. ८ विश.

मालिनीः-चतुर वर विचारें धाडिला आजि तातें
सबळ मज कपाळें घात केला निघातें
विपरित लिखितार्थी चूकि या अक्षरातें
मदन सदनि आतां वीष देईल यातें ॥१०॥

प्रमाणिका :- विचार काय मी करूं । कसें मनासि आवरूं
सभग्या साजिरा वरू । रुपें स्वरूप आगरू ॥११॥
कितीक वाटिकांतरीं । विचार-सार ते करी
विवेक अंतरांतरीं । भरूनि धीर्यता धरी ॥१२॥

भुजंगप्रयातः-कसी धीट होऊनि मी प्रेमधामी
हटेसी पित्याकारणें बोलिलें मी
प्रभू भाव जाणोनि माझ्या मनाचा
वरू धाडिला पूतळा मन्मथाचा ॥१३॥

किती रम्य लावण्य दीपांतरींचा
महाराज हा भूपती भूतळींचा
बरीं साजिरा गोजिरा दीसताहे
विषालागि देतां करूं काय ? पाहे ॥१४॥

इंद्रवज्राः- पत्रीं कसें अक्षर चूकलेसें ।।
यकाक्षरें सुंदर हा विनासे
विष यासि देणें गुज लेहिलेंसे ।
यणें गुणें हें विपरीत भासे ॥१५॥

चिंतातुरा चंद्रमुखी धिराची ।
चिंता करी सुंदर भूवराची

वसंततिलकाः-चित्तीं विशाळ लहरी भ्रमसागराची
चित्तीं तें मूर्ति हृदयीं यदुनंदनाची ॥१६॥

---

९ कारन १० वरा ११ चींतत

नेत्रांबुजीं अंजन फार होतें
करांबुजें कजेळ काढिलें तें
ते सुंदर सूदलें[12] आंगुळीतें
यासंनिध या करि पत्रिकेतें ॥१७॥

भुजंगप्रयात :–पुढें वाचिली वोळि वेगी सतीनें
सुपत्रीं दिसे वीषयीं[13] यासि देणें
बरी चर्चिली कुंकुमानें[14] प्रितीनें
त्वरें पालवीं बांधली थोर मानें ॥१८॥

कळे काय यातें असे क्षीण[15] जाला
कळेना श्रमें वाटिकेमाजि आला
कळेना असे लागली भूक याला
कळेना कसे कोण अर्थी निजेला ॥१९॥

कळेना कसे ठाकला शीण देहीं
कळेना कसी भूक ताहान कांहीं
सुशुप्तीभरें देह संदेह नाहीं
असे रंगला कार्य चित्ताप्रवाहीं ॥२०॥

प्रमाणिका:–उपाय काय मी करूं । करूं वरास आदरू
हळूंच पाउलें चुरूं । कसी तनूस आवरूं ॥२१॥

भुजंगप्रयात :– वरा अन्न आणूं वना भोजनासी
तरी[16] ऊठवूं[17] प्राणनाथासि कैसी
रसाळें फळें ठेवितां संनिधेसी
न भक्षी कदा भूप लावण्यरासी ॥२२॥

मालिनी:– क्षणभरि रगडूं मी पादपद्में वराचीं
अगणित म्हणि भंगे दीर्घ निद्रा भुपाची

---

१२ हा शब्द समासांत असून तोहि नीट वाचतां येत नाहीं. १३ विशया
१४ कुंकुमानें १५ सिन. १६ 'री' समासांत. १७ उठउ.

लवकरि लवलाह्यें नीज भंगेल याची
धिटपण निट ठाके लाज तेव्हां जनाची ॥२३॥

भुजंगप्रयात :– विराजे बहू खेद याच्या शरीरा
तनू तापली थोर जाला उबारा
हळू काय घालू तऱ्हीं मंद वारा
श्रमाचा[18] कसा[19] होय आतां निवारा ॥२४॥

त्वरें ऊ(ठवूं[20]) प्राणनाथासि आतां
पुसूं ना ययाचे मनीं काय चिंता
विचारें वरें चोज वाटेल कांता
वरावी कसी नोवरी[21] धीट कांता ॥२५॥

मालिनी:– हळफळ न वरी हे अंतरीं धीट मोटी
तळमळ विषयांची थोर गाटी गट्टी
लगबग लवलाह्य पातली सैर पोटीं
म्हणवुनि मजला हे आळि येईल खोटी ॥२६॥

भुजंगप्रयात:–विचारूनि हे बुद्धि बाळा निघाली
विचारें वरें मंदिरालागि आली
सख्या पूसती हाटकांगी सखीला
मुखाब्जीं सये कां तुझ्या स्वेद आला ॥२७॥

मुखांबूज कोमायलें काय जालें
गळाली तनू फार मंदत्व आलें
तुझें चित्त कां भ्रांत होऊनि गेलें
कसें सौख्य चिंताप्रवाहीं निघालें ॥२८॥

उभे ठाकले स्वेद रोमांचे[22] देहीं
मनस्वी तुझें चित्त चिंताप्रवाहीं

---

१८ श्रेमाचा. १९ कैसा. २० येथें 'ठवूं' हीं अक्षरें मुळांत नाहींत तीं मी स्वतःचीं घातलीं आहेत. २१ 'नोवरी' हा शब्द समासांत आहे. २२ रोमांच्य.

तनू वृत्ति वेडावली शुद्धि नाहीं
सुचेना तुला सार साचार कांहीं ॥ २९॥

तोटक:- भरले निजनेत्र तुझे जिवनें
वदसी भ्रमभ्रांतिकळावचनें
तनुचित्त सुचित्त नसे, न कळे
विकळांग कळा तुझि कां विकळे ॥३०॥

भुजंगप्रयात :- न बोलुं सयाला गृहामाजि आली
प्रयेंकीं घडी यकि बाळा निजेली
अवस्था मनीं फार लागोनि गेली
वियोगें किती श्वास उच्छ्वासें[२३] घाली ॥३१॥

प्रमाणिका:-गृहांतरांत अंतरीं । विचार फार ते करी
किती वियोग-वोवरीं । मनें मनासि आवरी ॥३२॥
न ये भुपाळ आझुनी उशीरें[२४] फार लागला
करूं विचार काय मीं विवेकासिंधु भंगला
किती मनासि आवरूं सुरंग तो विरंगला
अफाट वाट पाहतां मनिं कुरंग विंगला ॥३३॥
सभाग्य खंजलोचनी । तयासि भेटली वनीं
तरीच गुंतला गुणी । नय भुपाळ आझुनी ॥३४॥

विबुधप्रिया:-यावरा वनवाटिके विर धीर गंभिर भूपती
नीजला वनभूवनीं भुप भीम सुंदर सूमती
तो प्रभू नृपराज राजित साजिरा गुणसंपती
केसेरी[२५] शशिहास्य भूवर पावला निज जागृती ॥३५॥

वसंततिलका:-प्रक्षाळिलें वदनपंकज पात्रपाणि
जालें हरिस्मरण सुंदर रम्य वाणी
केला तुरंगम मनोरम सज्ज वेगीं
हेमांबरें सकळ राजित अंगसंगी ॥३६॥

---

२३ स्वास उस्वास. २४ उसीर. २५ केशरी.

भुजंगप्रयात :- तुरंगासनीं वीरबाहो निघाला
त्वरा दुष्टबुद्धिगृहा शीघ्र आला
प्रभू द्वारपाळासि बोलों निघाला
समाचार संनीध साकल्य केला ॥३७॥
पुढें मान खालावुनी राजयातें
मुखें सांगती दूत मंत्रीसुतातें
त्वरें पातले वीर वेगीं सभेतें
प्रधानें प्रभू धाडिले पत्रिकेतें ॥३८॥
तुरंगासनीं यकला यकदेसी
महावीर आला उभा द्वारदेसीं
दिसे धीर गंभीर लावण्यरासी
प्रतापी प्रभू भीमभारें महीसी ॥३९॥
प्रमाणिका:-महींद्र-मंत्र-संपती। कुळींद्रपुत्र भूपती
दिसी सभाग्य सूमती। विराजमान आकृती ॥४०॥
भुजंगप्रयात :- असे चंद्रहास्या प्रभू नांव त्याचें
दिसे रत्न लावण्यदीपांतरींचें[२६]
वयें धाकुटा ठाणमानें विलासे
तनू सर्व सामुद्रिकें रंगलीसे ॥४१॥
मालिनी :-मदन मग विलासें भेटला भूपतीसी
भुमिवर भुपतीनें आणिला मंदिरासी
नृपर लवलाह्यें पूजिला आदरेंसी
झडकरि सुखसिंधू दे करीं पत्रिकेसी ॥४२॥
उपजाति:- निरोप हा सत्वर जाणवीजे।
पत्रप्रमाणें निजकार्य कीजे
ते पत्रिका पावन पूर्वजाची।
वाची मनीं मंडित अक्षराची ॥४३॥

---

२६ दिपांतरींचें.

शार्दूलविक्रीडित[२७]:-

स्वस्तिश्री मदना विवेकसदना सद्वृत्ति सद्भावना
बुद्धी-बोधघना सकाम सघना पत्रार्थे आणी मना
केली जे सुचना सरोजनयना सिद्धार्थिची साधना
घे चित्तीं रचना मनीं निजखुणा हे कोटि विज्ञापना ॥४४॥

भजंगप्रयात :- विचारें बरें धीर गंभीर होणें
विरश्रीवरें वीषया यासि देणें
गुणीं गुंतसी गुप्त गुह्यार्थ घेणें
गुणी गुंति नाहीं गुणातीत होणें ॥४५॥

द्रुतविलंबित :- वयगुणा रचना करिसी मनीं।
बुधजना सजणा पुससी क्षणी
निजखुणा सुचना तुजलागुनी
क्षणिं मना करुणारुप सोसनी ॥४६॥

भुजंगप्रयात :- मनीं वाचिलें पत्र मानें निघाला
सखा सैंद्य[२८] सभ्रांतरामाजि आला
सुखें मायसंनीध बोलों निघाला
समाचार साचार साकल्य केला ॥४७॥

मालिनी:- निजवर विषयतें भूवरें पाठवीला
महिपति पितियाचें पत्र घेऊनि आला
हिमकरवदनेचा सौख्यसिंधू उदेला
उडुपतिवहनोक्षी[२९] काय बोले सुताला ॥४८॥

भुजंगप्रयात :- पुढें पत्रिका वाचितां वारिजाक्षी
किती[३०] दाटल्या रम्य रामा गवाक्षीं

---

२७ लेखकानें ह्या वृत्ताचें नांव शृग्धराछंद असें दिलें आहे २८ सध्ये.
२९ उडपतीवहनाक्षी ३० 'ति' हें अक्षर समासांत आहे.

उभ्या यक यकांत कांता मृगाक्षी
वरा सुंदरा लक्षिती खंजनाक्षी ।४९।।

द्रुतविलंबितें[31] :- वदति विस्मित वारिज-लोचनी
सरस हा वर सुंदर साजणी
मदनमूर्ति मनोहर कामिनी
वदन इंदु विकासत भूवनीं ।।५०।।

भुजंगप्रयात :- वदे काय माया विशी वीषयची
कसी कन्यका भाग्येवती[32] गुणाची
इनें पूजिली मूर्ति पूर्वी शिवाची
बरी प्राप्ति पुण्यें वरा सुंदराची ।।५१।।

मालिनी :- मदन सदनदेसीं बोलिला मायपासी
चतुर वर विलासी थोर लावण्यरासी
विमळ कुळकळेसी साजिरा सद्गुणेसी
अढळ शिळबळेसी भीम भारें महीसी ।।५२।।

भुजंगप्रयातः- किती हांसती बंधुजाया[33] तयला
वराया तुम्हां आमुच्या बंधुवाला
उभी पाठिमोरी वदे काय त्यांला
तुम्ही निर्लजा थोर नारी नकेला ।।५३।।

मालिनीः-सुखकर पितियाची पत्रिका प्रीतिभावें
समजत मज नाहीं काय कैसें करावें
उमजुनि सजणी तें म्या निजीं कां निजावें
मदन मनिं विचारी मीपणीं कां भरावें। ।५४।।

द्रुतविलंबितः- मदन-माथ मनी मृगलोचनी
विरवरा वरिजे गजगामिनी

---

३१ या वृत्ताचें नांव लेखकानें ' चंद्रमणी छेंद ' असें दिलें आहे.
३२ भाग्येवती. ३३ ज्याया.

उसिर या करुतया करिसी झणी
करि तया विषया भुपकामिनी ॥५५॥

मालिनीः-उशिर नकरि आतां कार्यसिद्धी करावी
तुज तरि पितियाची पत्रिका पूर्ण भावी
द्विजवर लवलाह्य आणिला श्रेष्ठबुद्धि
विवरुनि घटितार्थी साधिली लग्न[34]सिद्धि ॥५६॥

इंद्रवज्राः- अस्ताचळीं भास्कर पूर्ण जेव्हां
गोधूसरीं[35] राजित लग्न[34] तेव्हा
हे साजिरी सुंदर सिद्धिवेळा
बोले सती-सन्निध पुण्यशीळा ॥५७॥
सेजारणी राजित राजसेची
होती सखी सन्निध संगतीची
तीचे गृही[36] मंडित मंडपासी
केली क्रिता आइति आदरेंसी ॥५८॥

भुजंगप्रयात :- विवेकें इळापाळ संतोषवीला
तिचे भूवनीं भूपती बैसविला
सुना, बंधु, ज्यामांति[37], जाया मृगाक्षी
सवें पाठवी राजसा पंकजाक्षी ॥५९॥

शुद्धकामदा :- मदन-नागरा पातली त्वरा
सदनिं सुंदरा नान्हिती वरा
हळदि आगरा लाविती बऱ्या
सजणि साजिरा रम्य नोवरा ॥६०॥

सखि गुणालया बोलल्या[38] सया
भुप वरावया कोण हे किरया

---

३४ लग्न. ३५ गोधुशरीं. ३६ ग्रहीं. ३७ ज्यामाती. ३८ येथें 'बोल' ही अक्षरें चरणांत असून 'या' हें अक्षर समासांत आहे. मी संदर्भानुसार 'बोलल्या असा पाठ बनविला.

चतुर राजया होतसे प्रिया
पाहा मनोदया. धन्य वीषया! ॥६१॥
सजणि बोलती वीपयप्रती
हळदि लाविमी सुंदरा किती
सकळ भूमती सौख्य सांगती
सफळ सुमती धन्य तूं सती ॥६२॥

भुजंगप्रयात:- वरासंनिध सेंवती संभ्रमेसी
पुजा रम्य राजा करी आदरेंसी
अलंकार दिव्यांवरें दे वरासी
तुरें कानकल्लोळ जाला सभेसीं ॥६३॥

मालिनी:- विमळ कनकपात्रीं माय हेमावतीनें
सुरस सकळ अन्नें सिद्ध केलीं सतीनें
रुखवत लग्नाहीं धाडिलें सुमतीनें
मदन नृप मृगाक्षी वाढिलें पंगतीनें ॥६४॥

भुजंगप्रयात :- पुढें रम्य राजा पुजा इंदिरेची
वरी पाठवी भव्य नाना परीची
फळेंसी अळंकार वस्त्रें अनेकें
वरीं रंगलीं रम्य रत्नें वराकें ॥६५॥
पुढें आणिला श्वेत वारू सभेला
तयाकारणें सर्व शृंगार केला
विराजे वरी नोवरा बैसवीला
तुराचा किती कान कल्लोळ जाला ॥६६॥
सुरंगें वरी रंगलीं श्वेत छत्रें
विराजीत हेलावतीं सूर्यपत्रें
निशाणें झळाळीत चित्रें विचित्रें
किती भेरि घाघाटती भीमसुत्रें ॥६७॥

---

३९ आंम्रें

प्रमाणिका :– कितेक मेघडंबरें। कनक-दंड चामरें
सुवर्ण मत्छ साजिरे। रुपें विशाळ गोजिरे ॥६८॥

भुजगप्रयात :– किती नाचती नाचणी नृत्यरंगें
भरें सुस्वरें मान-कल्याण-रागें
धिगार्गीत धी धी धा मा थां थागें
भ्रम थे थे थै था पंचमागें ॥६९॥

भराग नळे ऊठल व्योमपंथीं
झळाळीत तेजें किती इंदुज्योती[40]
किती वाण भांडीं भडाडीत मानें
कडाडीत घांघांटती औशधानें[41] ॥७०॥

निघाले पुढें भार द्वीजोत्तमाचे
विराजे मुखीं घार्पे[42] वदश्रुतीचे
किती गाति गार्णी थवे गाथेकाचे[43]
किती दाटले लोक भारें पुरीचे ॥७१॥

भुजंगप्रयात :– किंकाटें कटें भीम मातंग भारें
विदी दाटली दाटि मोटा तुखारें
किती वर्णिती भाट वेताळ थाटें[44] ॥७ ॥

प्रमाणिका : कितेक बोलती सया। सखी सभाग्य वीशया
वरासि लाधली इया। अमूप संचली क्रिया ॥७३॥

भुजंगप्रयात :– किती चंद्रहास्यासि देखोनि नारी
किती बोलती कोण लीलावतारी
भिमा पूजिली भीमभारें वरानें
किती गारवीली अळंकार मानें ॥७४॥

---

४० जोती. ४१ औशधानें. ४२ घोश. ४३ हा शब्द 'गाधकाचे' असा लिहिल्यासारखा दिसतो. ४४ या श्लोकांत तीनच चरण आहेत.

गिरी कुंभें पूर्णोदकेसीं विचित्रा
उभ्या दोनि दोहींकडे खंजनेत्रा
प्रभू अवरें दे तयालगि वेगीं
रवघाल्या मनीं हर्षे गेल्या कृशांगी ॥७५॥
त्वरा दुष्टवुद्धीसुता हाटकांगी
स्यैजी मूद वोदाळुनी हेमअंगी
त्वरा नोवरा मंडपामाजि आला
मधूपर्क यानंतरें शीघ्र केला ॥७६॥
करी कैन्यकादान राजा गुणाचा
वरा ज्येष्ठ वंधू मग्न वाशयेचा
पुढें अंत्रपाटाप्रती शीघ्र केले
समेच्या जना सादरें वेजवीलें ॥७७॥

सावधान सावधान सावधान साधनी
सुचित्त सावधान तूं अखंड रामचिंतनी
समीप साध्यसाधनास देव साधितां मनीं
सखा करूनि सद्गुरु करा स्वर्ज्ञानशोधनी ॥७८॥

शार्दूलविक्रीडित :- मंगळाष्टके

चित्तीं चिंतुनि आदरें गणपती ते सारजा सुंदरा
शंभू भुवननाथ आणि गिरजा श्रीरेणुका गोचरा
सीता, राघव, मारुती, सुरनदी, सिंधूसुता श्रीवरा
इंदू सूर्य मरुद्गणी द्विजवरां देयादळं मंगळं ॥७९॥
आतां ते नवनाथ सिद्ध सुमनी शाखांवरी योगिनी
विद्या मंत्र मकार भैरवकळा वेताळ भूयक्षिणी
शास्त्रें वेदविधान याग तपसीं तीर्थ क्रिया उन्मनीं
मुद्रासाधन आगमादि सकळें देयादळं मंगळं ॥८०॥
तदेवलग्न सिद्धि हे सुदीन आजि बिंबला
उडंगणाधि चंद्रमा बळकरू नि तुंबला

४५ येथे मुळात एक 'पु' अधिक आहे. ४६ येजी ४७ कंनीका

विबुद्ध वेद देवही स्मरोनिया अवंतिला
करुपाळ इंदिरापती मनांतरांत चिंतिला ॥८१॥
ॐ पुण्ये म्हणती विवेक सुमती पद्यप्रती काढिलें
माथां घालिति अक्षता वधुवरां यके सुतीं जोडिलें
मंत्राच्या गजरीं वरी निज करीं ते कंकन बांधिली
कन्यादान मनें करूनि मदनें सर्वी क्रिया साधिली ॥८ ॥

भुजंगप्रयात :- द्विजाचे मुखीं घोष वेदश्रुतींचा
भरें कान कल्लोळ मोटा तुराचा
पुढें सिंपिला चून गौरीहराचा[48] ॥८३॥
वरू आदरें शिबला बैसवीला
करी व्रीहि[49] लैज्जा वरा होम केला
धनें वाटिलीं सर्वही याचकांला
असें आदरें पि[50] आज्ञा तयाला ॥८४॥
किती वर्णिती भाट वताळ थाटें
उचाऊनिया हस्त लोटें चपेटें
किती नृत्यती नृत्यकारें विचारें
किती पूजिलीं याचकें द्रव्यभारें ॥ ८५ ॥

शार्दूलविक्रीडित :-
देती धेनु, तुखार, हेम, वसनें, यानें मनें याचकां
हे राजा करि तृप्तिं[51] सर्व सजना संतोषवी साधकां
साधू सज्जन पूजिले अतिभरें, मावार्थिला नेटका
जाले वासर यासि तीन पुरते आतां कथा आयका ॥ ८६ ॥

तोटक :- हयमेधकथा रमणीय निधी
भरला भिम अर्थेनिरें उदधी
यदुराजचरित्र-कथा-लहरी
कवि रामसुतात्मज ग्रंथ करी ॥ ८७ ॥
प्रसंग सहावा श्रीकृष्णार्पणमस्तु

---

४८ ह्या श्लोकांत तीनच चरण आहेत. ४९ व्रीह्यलज्जा. ५० पीतु ५१ तृप्ती.

# प्रसंग सातवा

भुजंगप्रयात :- असो यावरी तीकडे दुष्टबुद्धि
बळें घातलेसे कुळींद्रासि बंदीं
किती पीडिले लोक नाना समंधी
पुरीच्या जना थोर केली उपाधी ॥ १ ॥
जनाचीं धनें राजभांडारभारें
भरोनी भरें चालिला तोषभारें
सवें गोधनें हेमरंती तुखारें
पुढें खंडिला मार्ग येतां विखारें ॥ २ ॥

प्रमाणिका :- म्हणे भुजंग, भूपती । तुझी समस्त संपती
बहूत दीस रक्षिली । परंतु सर्व वेंचली ॥३॥

भुजंगप्रयात :- तुझी कन्यका वीषया रूपवंती
दिल्ही चंद्रहास्यासि बाळा निवांती
असें बोलतां तो फणी गुप्त अन्तीं
किती खोचला दुष्टबुद्धी मनांतीं ॥ ४ ॥
मनीं भ्रांतला चालिला राजपथें
पुढें देखिलें भव्य द्वीजोत्तमातें
टिळें अंबरें ऊटि माळा तयातें
करीं रम्य गाई सुखानंदचित्तें ॥ ५ ॥
पुसे आजि कोठूनि आलेति स्वामी
असे तूमचा ग्राम तो कोण भूमी
ओंशिर्वाद देऊनि आधीं प्रभूला
समाचार सभीध साकल्यें केला ॥ ६ ॥

ज्वाला छंद:- मदन पुत्र तुझा विरराज तो
अढळ-शीळ-बळें बळि तुंबतो

---

१ तोश, २ दिखिले, ३ 'द' हें अक्षर समासांत आहे, ४ असीर्वाद
५ साकल्ये.

विमळ साधु सखा धिर राजतो
अढळ पूर्णकळा कळि बिंबतो ॥७॥

भुजंगप्रयात :- प्रभू लँग्न केलें बरें वीषयाचें
वरू जोडला रत्न वैरागरीचें
समाधान केलें किती याचकाचें
नृपा पूरलें कोड यथें मनाचें ॥८॥
धनेसीं मनें याचकें धन्य केली
विवेकें किती कीर्ति होऊनि गेली
नय सांगतां भक्तिगंगा निघाली
सखीं सोयरीं सर्व संतोषवीलीं ॥९॥
असें सांगतां संनिध ब्रह्मरंदें
सुतानें तुझ्या लँग्न केलं आनंदें
महोत्साह केला सुखानंदकंदें
किती सार सत्वार्थिला भक्ति मेदें ॥१०॥

तोटक :- प्रभु हाटक-तंतु नवीं वसनें।
दिधलें धन धान्य दयानिधिनें
दुभत्या धिर धेनु उदारपणें।
जन याचक तृप्ति मनें सुमनें ॥११॥

भुजंगप्रयात :- सकोपें वदे दुष्टबुद्धि दुतातें
म्हणे रे धरा सर्व दोषाचरातें
त्वरेनें हरा धेनु घ्या अंबरातें
अलंकार काढ्यास या तस्करातें ॥१२॥

प्रमाणिका :-बळाढ्य दूत ते किती। द्विजोत्तमालि मारिती
बळेंकरूनि झोंकिती। किती भुमीस अंसडिती ॥१३॥
कितेक हाणती करें। मुडुप लात कोपरें
करीं धरूनि नीकरें। करासि बांधिती कँरें ॥१४॥

---

६ लश,७ मोहत्साह, ८ 'याच' हीं अक्षरें समासांत आहेत, ९ येथें 'सअ' हीं अक्षरें पृष्ठशिरावरील आहेत आणि 'डि' हें अक्षर 'ढी' असें दिसतें, १० हा सबंध चरण समासांत आहे.

दुतासि कोप नावरे । द्विजासि पाडिती घरे
बलाढय द्वीज तो झुरे । लपें वनांत तो तरे ॥१५॥

शिखा धरूनि हस्तकीं । बुक्या चपेट मस्तकीं
कुरंग मातला दिसे । पुजा विधान होतसे ॥१६॥

तोटक :- धन धान्य दयाहिन घेति बळें
हरिती वसनें भुषनें सकळ
सुटल्या निज गाइ करीं सधना
पळती पुरिलागि वना सदना ॥१७॥

करिती करुणा द्विजराज सुखें
स्फुरती निकरें महाशंख मुखें
करुणानिधि आजि करी करुणा
प्रभु दंड कसा अपराधविना ॥१८॥

भुजगप्रयात :- पुढें वारिले दूत तैसा निघाला
त्वरा भूपमंत्री पुरीमाजि आला
पुढें पुत्र यवोनि वेगी तयाला
प्रितीनें पित्यातें नमस्कार केला ॥१९॥

उपजाति :- देखोनि मंत्री मदनासि आधीं
केलीं म्हणे तां कमनीय सिद्धी
पत्रीं बरी शोधुनि सर्व सिद्धी
पत्रार्थ-अर्थी तुज [12] तों सुबुद्धी ॥२०॥

पत्रार्थ-अर्थीं तुज काय जालें?
पत्रीं कसें चित्त भुलोनि गेलें
पत्रें पदार्थीं तुज वीनवीलें
पत्रांग अंगी मन काय केलें ॥२१॥

---

११ ह्यांतील 'दुतासिको' हा भाग डावीकडील समासांत असून ' पनावरे' हा भाग उजवीकडील समासांत शेवटीं दिला आहे., १२ तो.

द्रुतविलंबित :- विषतरू समुळीं खुडितां बरा ।
म्हणवुनी लिहिलें तुज पांमरा
अतिमुढा अधिरा भुमिसागरा ।
मतिहिना कुमती तरु आगरा ॥२२॥

वसंततिलकौ[१३] :- ऐसें प्रधान जंव बोलें[१४]त कूमरासी
बोले तयाप्रति सदा सुत आदरेंसीं
पत्रप्रमाण रचना सुखसंभ्रमेंसी
केली असे निजमनीं प्रभु पुण्यराशी ॥२३॥

पत्रीं पदार्थ सुचना मज भूपतीची
औशा[१५] मनीं न धरणें धन-संपतीची
सर्वी स्वभक्ति करिजे नृपनायकाची
घावी भुपासि विषया तनु हाटकाची ॥२४॥

द्रुतविलंबित :- बुधजना सजणा पुससी म्हणी
तुज खुणा सुचना मनिंचे मनीं
सुखमनें सुमनें निज भूवनीं
वधुवरें चतुरें पाहा लोचनीं ॥२५॥

भुजंगप्रयात :- म्हणो गुंतशीं द्र[१६]व्यं-आशा-प्रवाहीं
असें पत्रि काय ससंदेह नाहीं
तुम्हा यौक्यसिंधू[१७] सुखानंदडोहीं
बुडालों अकस्मात देहीं विदेही ॥२६॥

इंद्रे[१८]वज्रा :- हस्ताक्षरें राजित राजयाची
जाणोनिया जें मज वीजयाची
आज्ञा शिरीं वंदुनि भूपतीची
म्या साध्य केली मग संपतीची ॥२७॥

---

१३ वासंती छंद, १४ 'ल' हें अक्षर समासांत आहे, १५ अशा, १६ दव्यें
१७ 'क्यवा' अशीं अक्षरें उलटीं पडलेलीं आहेत, १८ वसंततीलका छंद.

भुजंगप्रयात :- पहा पत्र वाचूनि आधीं निवांती
करीं घीधलें, वाचिलें आदि अंतीं
असें वीषया यासि दे हेमकांति
मनीं भ्रांतला थोर विस्मीत चित्तीं ॥२८॥

म्हणे अंतरीं काय जालें कळेना
करी कर्म जें तें कदा आकळेना
बळें रेखिली ब्रह्मरेखा टळेना
पहा भीम होणार मार्गें वळेना ॥२९॥

तोटकं:- लिहितां मज भ्रांति कसी पडली
चुकलों भिम भूलि मना जडली
कसि नीर निरासि नदी चढली
मज वैरनि वेळ बळें घडली ॥२०॥

भुजंगप्रयात :- कसा चूकलों मीचि चिंताप्रवाहीं
सुताकारणें सर्वथा बोल नाहीं
मनीं मानिली पित्रु आज्ञा स्वदेही
नसे ना दिसे यासि अन्याय कांहीं ॥३१॥

पुढें दुष्टबुद्धी म्हणे पुण्यशीळा
तुझें पाहिलें चित्त बाळा दयाळा
सुपुत्रा बरी साधिली सिद्धिवेळा
त्रिलोकांतरीं कीर्ति केली दयाळा ॥३२॥

तोटकं :- मदनाप्रति काय वदे वचनीं
म्हणे तूं सगुणी गुणवंत गुणी
कमनीय कळा कळलासि मनीं
सुखदायक सिंधु तुझी करणी ॥३३॥

---

१९ भुदरवृती छंद. २० सुंदरछंद

वसंततिलका :-यानंतरें दिनमणी अचळांगआंगीं
गेला तमांतक भरें अति लागवेगी
मंत्री मनोरथ मनीं सदनासि गेला
धाडी सुतासि सदना भुप ओळगेला ॥३४॥

शार्दूलविक्रीडित :-

मंत्री सांगत सन्निध नृपसभे वेगी तुम्ही जाइजे
साष्टांगी नमनेंकरूनि सुमती राजा नमस्कारिजे
आलों मी सदनासि अस्तसमयीं[21] भूपाप्रती सांगिजे
सांगातें शुभ बोलके बळनिधी बंदीजना घेइजे ॥३५॥

भुजंगप्रयात :- त्वरा वंदिला तात तैसा निघाला
भरें भूपतीच्या सभे शीघ्र आला
नृपातें नमस्कार साष्टांग केला
समाचार साकल्य सांगे भुपाला ॥३६॥

उपजाति :-बद्धांजुळी राजित राजभारें
उभा वदे सादर निर्विकारें
विज्ञापना भुमिवरा परी प्रधानें
केली असे कोटिविधी विधानें ॥३७॥

रवि अस्तकाळीं कमनीय भोमा
आले पुरी मंडित मध्य धामा
कुळींद्र आला कुळवाडियाचा
प्रभु आजि आहे दिन साडियाचा ॥३८॥

मालिनी छंद :-तदुपरि पुसताहे कौंतळाधीश त्याला
कथि मज कवणाचा सांग वीवाह केला
सकळ जन सभेचे सांगती भूपतीला
चतुर वर नृपाळा वीपयलागि आला ॥३९॥

---

२१ समई.

तोटक :- वर सुंदर राजविरा चतुरा।
विर धीर विराजित वीरविरा
पाहा राजधिराज असे नवरा।
श्रुत सज्जन साधु नसे दुसरा ॥४०॥

नऽहे मानव यक्ष न देवकळा।
नऽहे किन्नर चौंरु[22] निचारु लिळा
रतिनाथसमान दिसे सगळा।
सुकुमार तनू किति पुण्यशिळा ॥४१॥

मालिनी :- नृपति रुप तयाचें देवरूपी कळेना
बळनिधि बळ याचें वर्णितां वर्णवेना
समुळ सगुणसिंधू सत्य सद्भाव भावीं
सुखकर सकळांसी साधु-संतस्वभावी ॥४२॥

वसंततिलका :-आहे बळें बळनिधी बळिवंत भासे
अंक्रा[23] दिसांत अवघी मह्नि जीतिलीसे
जंबू-समुद्र-वळयांकित जीतिलीसे
जे कोटि छेपन नृपांकित तुंबलीसे ॥४३॥

पंचचौंमर[24] :- प्रतापवीर केशरी प्रतापवंत आगळा
दयाळ धीर लक्षणी नृपाळ रंग लीखला
सखा सभाग्य सूमती स्वरूप रूप सावळा
विराजमान चंद्रहास्य नाम जाण लेइला ॥४४॥

विबुंधप्रिया[25] :-मानसीं जनवाक्य मानुनि कौंतळाधिश भूपती
कोपला मग मंत्रियावरि मानिली मनिं कूमती
आमचे घरिं कन्यंका[26] कमनीय चंपकमालती
तीविना विंधेंपेसि[27] राजित पाहिला वर सूमती ॥४६॥

---

२२ च्यारुनिच्यारु २३ अकरा २४ कवीनें या वृत्तास प्रमाणिका हें नांव दिलें आहे. ह्या श्लोकापुढील ४५ वा श्लोक गहाळ आहे. २५ भुजंग-प्रयात. २६ कन्येका २७ विशयसी.

भुजंगप्रयात :- नसावे घरीं राजमंत्री कुबुद्धी
पित्याचें तुझ्या नांव तों दुष्टबुद्धि
विराजे जसें नाम तैसी उपाधी
न देखों तयाचे मनीं शुद्ध बुद्धि ॥४७॥

उपजाति :- कापट्यसिंधू निजतात तूझा ।
विशेष मंत्री बहु दीर्नं[२८] माझा
सांगे तयाला निजकामनेतें ।
पाहा वरू चंपकमालतीतें ॥४८॥

मंदिरीं[२९] छंद :- सुंदर बाळा चंपकमाळा ।
सुमती लीळा कांचनकीळा
उपवर जाली निज जन बोली ।
वर तिसि आधीं मिळवि सुबुद्धि ॥४९॥
कांचें[३०]नकांती कळा झळका ।
राजित कुमरी चंपककळिका
तिसि वर सुंदर नायक नीका ॥५०॥

भुजंगप्रयात :- तुझा तात विख्यांत[३१] तो कर्मपापी
महा दीर्घ कापट्यरूपी कुरूपी
नव्हे सूमती साधु सद्भावरूपी
दुरात्मा दुराचार संताप कोपी ॥५१॥

* विबुधप्रिया :-आमची निज कन्यका[३२] कमनीय चंपकमालती
तीप्रती वरराज सुंदर पाहिना गुण संपती
आपुले विशयसि राजित आणिला वर सूमती
हा नव्हे निज सत्य सज्जन होय कूजन कूमतीं ॥५२॥

---

२८. दिन २९. कवि ह्या वृत्तास 'मंदिरा छंद' म्हणतो. पण ह्याचे सर्व चरण विषम आहेत. हें नांवहि कोठें सांपडत नाहीं. ३०. ह्या श्लोकांत चरण तीनच आहेत. ३१. विख्यात. * कवि ह्यास भुजंगप्रयात म्हणतो. ३२. कनीका.

वृत्त[३३] १ :- हितवंत नव्हे हितकारक कांहीं ।
सदया हृदयांत दया रति नाहीं
निजवर्म कुकर्म क्रियाहिन देही ।
विनट नसे सुधि कुबुद्धिप्रवाही ॥५३॥

मनोहर छंद :- छंदबंद बोलणें । हावभाव दावणें
डाव घाव साधणें । सावधाव रोधणें ॥५४॥

तोटक[३४] :- कुळवंत कुळी असतां सकुळी
करि हा भुतळी मजही न वळीं
करि जे रचना न कळे निजना
निति नाणि मना नगणी सजना ॥५५॥

भजंगप्रयात :- किती बोलती लोक भूनायकाला
प्रधानें महा दीर्घ अन्याय केला
तयाचे मनीं दैत्यसिंधू उदेला
सभेतें प्रभू आणवावें निघाला ॥५६॥
स्वरूपें रुपें आगळा ठाणमानें
कसा वीर गंभीर धीर प्रमाणें
पहावें प्रभू चित्त चातुर्यलीळा
कशीं लक्षणें लक्ष लक्षीं भुपाळा ॥५७॥

मंदिरा छंद :- कृत कुळशीला मग भुमिपाळा
पाहोनी डोळां देवों दयाळा चंपकमाळा ॥५८॥
कनकसुकीळा कुळसिळबाळा
विहित करुपाळा मनोमय लीळा
देवों दयाळा चंपकमाळा ॥५९॥

इंद्रवज्रा :- क्षितीपाळ भीमा सुखसिंधु पाहे
द्यावी तया चंपकमालती हे

---

३३. कवीनें या छंदाचें नांव दिलें नाहीं. ३४. कविदत्त नांव संभोग छंद'
३५. कवि ह्या वृत्तास वसंततिलका म्हणतो.

यावेगळें आणिक कार्य कीजे
दयानिधी हें निजराज्य दीजे ॥६०॥

भुजंगप्रयात:- कृपासिंधु राणा म्हणे सेवकातें
त्वरें जा वरालागि आणा सुपंथें
सवें दीधलें संत साधूजनातें
जनेंसीं किती धाडिलें सज्जनातें ॥६१॥

सवें सुंदरा स्वासिनी हाटकांगी
निघाल्या किती रम्य बाळा कृशांगी
विराजीत सूखासनी कांचनांगी
जैशा[३६] रंगल्या योगिनी आत्मरंगी ॥६२॥

विराजीत रंग सुरंगीत छत्रें
निशाणें, गुढ्या साजिरीं सूर्यपत्रें
मुखें भीम मैच्छाकृती[३७] मेघपात्रें
किती दाटिली दाटि चित्रें विचित्रें ॥ ३॥

धडाडा धिडिम् ढोल जंगी नगारे
धमक धों दमामे दुंदुभी[३८] तुतारे
भडाडीत भेरी दुटाळा तुतारे
दणाणीत घाघाटती कान थोरें ॥६४॥

कटेसीं मदोन्मत्त दंती किंकाटे
किती थाटलीं अश्वथाटें फुफाटें
बिदीसी किती थाटलीं लोकथाटें
ब्रिदें बोलती भाट नेटें चपेटें ॥६५॥

पुढें नृत्यतीं नृत्यकारें सुरंगे
किती सुस्वरें मानकल्याणरागें

---

३६ जस्या. ३७ मछयाकृती. ३८ दुदंभी.

किती गाति गार्णी क्रिया पंचमांगें
किती संग संगीत संगें सुसंगें ॥६६॥

दोधक[39] :- संगित गीत सुरंगि तरंगी
ताळ मृदांग सुधांग उपांगी
सुस्वर तंत वितंत वरांगी
गायन गाती झालरि थोंगी ॥६७॥

तोटक छंद :- नृपती विरराज म्हणे मदना
वर राजित भूप रिपूकदना
सर्वें सुंदर आणि शशीवंदना[40]
इतुकें करि कार्य सख्या सजना ॥६८॥

मदना मनभंग क्षणीं करिशी
धरि तूं हित- रंगीं[41] मनीं तरसी
हृदयांत कुरंग[42] कळा करिसी
विजनांत विरक्त-मतें सरसी ॥६९॥

विवरूनि विचार विवेक करी
तव तात विकल्प कदा न करी
अविवेक विकार भरो-उभरी
अविचार मनांत कदा न करी ॥७०॥

भुजंगप्रयात:- बिदी दाटली थाटला लोकपाळा
किती कानकल्लोळ कर्णीं उमाळा
तुखारे तुरे कुंजरे यकमेळा
पुरीचीं जनें वीजनें होती गोळा ॥७१॥

---

३९ कवि या वृत्तास सुंदर छंद म्हणतो; पण यांत तीन चरण दोधक वृत्ताचे असून चौथा चरण चंपकमालेचा आहे. ४० शिशीवदना ४१ पोथींत रंग च्या पुढें 'म' हें अक्षर आहे. ४२ हा शब्द 'कुरूग' असा आहे.

दुतविलंबित[43] :- मदनमानस फार विसंचलें
किति मनीं सुमनीं सुख संचलें
नृपतिवाक्य कळे मन बिंबलें
विकळ चित्तनदी[44] जळ तुंबले ॥७२॥

भुजंगप्रयात :- त्वरें मान खालावुनी भूपतीला
पदांबूज वंदून तैसा निघाला
बिदीलोक जेथें तयांमाजि आला
कवी रामसुतात्मजें ग्रंथ केला ॥७३॥

प्रसंग सातवा कृष्णार्पणमस्तु

---

## प्रसंग आठवा

* इंद्रवज्रा :-येरीकडे दुर्जन दुष्टबुद्धी
बोलाविले अंतक कर्म व्याधी
जे निर्दयी[1] दानव धूर्तसिद्धी
प्राणांतकारी करूनी कुबुद्धी ॥१॥

भुजंगप्रयात :- दुराचार आचार संतापतापी
क्रियाहीन कर्मांध काळस्वरूपी
कळेना तया सार वीचार पापी
मतीमंद मांतंग[2]कर्मी कुरूपी ॥२॥
म्हणे राजमंत्री महावीरबाहो
तुम्ही आमुचें कार्य[3] कांहीं करा हो
वदे निर्दयी द्रव्य[4] देऊनि कांहीं
रहा चंडिका-गुप्त-गाभार-गेहीं ॥३॥

---

४३ कवि ह्या वृत्तास मालिनीछंद म्हणतो. ४४ चीत.

* कवि ह्यास भुजंगप्रयात म्हणतो. १ निर्दइ. २ मातांग. ३ कार्ये. ४ द्रव्यें.

महाद्वार देवालयीं देवपूजे
तयाला तुम्ही शीघ्र प्राणांत कीजे
महावीर हो चंड वीतंड बंडे
करावी तनू खंड-खंडें-विखंडें ॥४॥

अरी खंडितें खंडुनी धडमुंडें
पुजा चंडिका चंड भावार्थ मुंडें
करा कार्यसिद्धी तुम्हाला उदंडें
बहू द्रव्य देईन वस्त्रें वितंडें ॥५॥

अथानंतरें शस्त्रपाणी निघाले
दुराचार अंबालयालागिं आले
कळेना जनालागि ऐसे उडाले
भुयारांतरीं गुप्त दोघे दडाले [६] ॥६॥

उपजाति छंदः- मंत्री-मनीं खंडिन या नृपाला
आला त्वरें मंडित मंडपाला
मानूनि मानें महि-मंडनाला
वदे विलासें रिपुखंडनाला ॥७॥

तोटक छंद :- कुळवंत किळाधिभुपाळकुळा
कमनीय कुळींद्रकुळा अचळा
कुळधर्म कुळीं कुळपुण्यशिळा
कुळशीळ कुळीं कुळदेवि कुळा ॥८॥

प्रमाणिका :- अखंड दंडली मुळीं प्रचंड चंडिका कुळीं
बळें बळाढ्य आगळी। बळोच कांपती चळीं ॥९॥
समूळ हे परंपरा। पुजी परेसि नोवरा
अपार-पार-गोचरा। पराप्रवीण खेचरा ॥१०॥

---

५. देवायेली, ६ पोथींत या ठिकाणीं पांचाचाच अंक आहे; वस्तुतः तेथें सहा पाहिजे. येथून पुढें श्लोकांचे क्रमांक २५ पर्यंत मी दिले आहेत.

भुजंगप्रयात :- वदे चंद्रहास्यासि चातुर्यभावें
तुम्ही शीघ्र अंबालयालागिं जावें
बरी वीनवावी विराजीत वाणी
पुजा आदरें आदिमाया भवानी ॥११॥

[7]द्रुतविलंबित छंदः- नवविधी पुजणें नवमंत्रिका
अगर-केशर-चंदनपत्रिका
सरस कुंकुम सूमन माळिका
कनककांति पुजा कुळबाळिका ॥१२॥

मॉलिनीः- विमल कनकताटीं सिद्धि देवार्चनाची
नवविधि नवपात्रें पूर्ण पंचामृताचीं
भरुनि भजन झारी घ्या[8] करीं कांचनाची
विनवुनि[9] जगदंबा सिद्धि गौरी गुणाची ॥१३॥

कामिंदा[10] :- जाइजे तुम्ही यकलें बरें
संगती नका नेउं[11] दुसरे
अंबिका पुजा भूषणांबरें
रंगणीं उदो जागवा भरें ॥१४॥
जा[12] उठा बरें अंबिकालया
भूवरा वरा अति गुणालया ॥१५॥

भुजंगप्रयात[13] :- सुताटीं बरीं द्रव्यरत्नें निधानें
करीं दीधलीं दुष्टबुद्धी प्रधानें
पुजा वेदमाता मनीं सावधानें[14]
असा धाडिला वीरसिंधू विधानें ॥१६॥

---

(७) कवि या वृत्तास भुजंगप्रयात म्हणतो. ८. 'घया', ९. विनउनि १०. पोथींत या वृत्ताचें नांव सुगरिणी असें आहे. ११. मुळांत या स्थळी 'नीद्य' असा शद्ब आहे. मी अर्थानुरोधानें 'नेउं' हा शद्ब घातला आहे; 'निंद्य' असाहि शद्ब घेता येईल १२ ह्या श्लोकाचे चरण दोनच आहेत. १३. मुळांत या वृत्ताचें नांव दिलें नाहीं. १४. सावधान,

वसंततिलका:- येरीकडे मदन मंडित राजभारें
आला असे विर विराजित निर्विकारें
तों देखिला निजविर्दी उदधीसा भारें
भावें मनांत भरलीं भजनें अपारें ॥१७॥

द्रुतविलंबित :-विमल हाटकताट पटान्तरें
कनक-कुंभ करीं भरला निरें
भजन साधु मनीं भरला भरें
वदनिं राम हरी हर उत्तरें[15] ॥१८॥

मालिनी :- मदन पुसत भावें भूपती भीम भौमा
सदन त्यजुनि कोठें जातसा कोण कामा
महिवर तव तातें धाडिलें पुण्यधामा
पुजनविधिस जातों[16] अंबाअरामा ॥१९॥

भुजंगप्रयात:- कुळीं तूमच्या मूळमाया भजावी
मुळीं यकली[17] यकवीरा पुजावी
दिनांतीं पुजा भव्य साजें करावी
भवाची नदी भक्तिभावें तरावी ॥२०॥

द्रुतविलंविर्ते[18]:- मदन त्यास म्हणे गुज आयका
महिपती-विनती सुखदायका
तुज निमित्त[19] पुरीं नृपनायका
निज न य शयनीं सुखदायका ॥२१॥

विरपदीं शिबिका सुखआसनें
रथ तुखार तुरें सुमनासनें
कनक-अंदु पदीं करि जोडिले
मुळ तुम्हां गजरें गज धाडिले ॥२२॥

---

१५. उतरें, १६. येथें एक गुरु, एक लघु अशीं दोन अक्षरें उणीं आहेत. १७. यकलों, १८. कवि यास 'ज्वाळाछेंद' म्हणतो. १९. नीमीत्य

नगरनाथ-मनीं नृपनागरा
मज गमें करणें तुज सोयरा
दरुशनाप्रति जा[20] जैन-आगरा
त्वरित भेटुनि[21] या मग मंदिरा ॥२३॥

भुजंगप्रयात :- पुजापात्र घेऊनिया यकला मी
प्रभू शीघ्र जातों पुजेकारणें मी
अहो चंद्रहास्या महीवीर-भौमा[22]
त्वरेनें तुम्ही जा प्रभू भूपधामा ॥२४॥

पुजापात्र घेऊनि तैसा निघाला
त्वरें पातला शीघ्र अंबालयाला
महाद्वारदेशीं उदो जागवीला
कळेना कसें काळें[23] सन्नीध आला ॥२५॥

कळेना कदा काळवेळा कळेना
कळेना कदा[23] कर्म हें आकळेना
कळेना कदा कर्मरेखा टळेना
कळेना कदा कोण कर्ता वळेना[24] ॥२६॥

कळेना गती कोण आहे देहान्तीं
कळेना तया मृत्यु अंबालयांतीं
कळेना उभा ठाणमानें निवातीं
कळेना भुयारांतरीं प्राणहंती ॥२७॥

भुयारांतरीं भीम काळस्परूपी
निघाले अकस्मात संतापतापी

---

२० यांतील 'ज' हें अक्षर समासांत आहे. २१. भेठुनि, २२. भेमा, २३. येथून पुढील सव्वीसाव्या श्लोकाच्या दुसऱ्या चरणांतील 'कदा' पर्यंतची रचना समासांत दिली आहे. २४. येथून श्लोकांचे क्रमांक बरोबर आहेत. कवीनें या श्लोकांवर

कुकर्मी क्रियाहीन कापट्य कोपी
निधी निर्दयाचे दयाहीन पापी ॥२८॥
हटें टाकिलें खड्ग दोर्दंड-बंडें
तनू खंडिली खंडखंडें विखंडें
मुखांबूज खंडूनि केलीं दुखंडें
सडा शोणितांचा[२६] भरे भूमि दंडे ॥२९॥

वसंततिलका :- येरीकडे गुणनिधी नृप चंद्रहास्या
भेटावया विनटला भुप कौंतळेशा
वागासनीं विर विराजित[२८] बैसवीला
मानें महींद्र जनमंडित चालवीला ॥३०॥

भुजंगप्रयात :- बिरीं दाटला थाटला लोकपाळा
तुखारें तुरें कुंजरें यकमेळा
घडाडीत घाघाटल्या यंत्रमाळा
कडाडी नभीं कान कल्लोळ जालां ॥३१॥

द्रुतविलंबित :- विमळ हाटक-दंड मनोहरें
विनटलीं ढळतीं वरि चामरें
लिगटली नटलीं घन-डंबरें
सरस सुंदर गायन गोजिरें ॥३२॥
विमळ मंडित मागध वर्णिती
सकळ कीर्तिकळाकर दाविती
अचळ सिंधुसुता सुखसंपती
भुपदळीं तुजला[२९] किति कांपती ॥३३॥
तव प्रतापबळें वडवानळें
करपलीं भुतळीं भुपमंडळें

२६. हा क्रमांक दिला आहे. २७. श्रेनीताचा, २८. 'त' समासांत आहे.
२९. 'ला किति' हीं अक्षरें समासांत आहेत.

प्रगट कीर्तिनिधी कुळ तुंबलें
भुपदळें विकळें बळ आगळें ॥३४॥

वसंततिलका[31] :-तेजें सतेज दिपिका दयदीप्यमानें
तैसे हिलाल जळती किति तेजदानें
नृत्यांगना सकळ संगित सावधानें
तंती वितंत घन सुस्वर सावमानें ॥३५॥

भुजंगप्रयात :-सभे श्रेष्ठ सिंहासनीं भूप जेथें
प्रभू पातला शीघ्र संनीध तेथें
पुढें देखिला चंद्रहास्या निवांती
प्रभा साजिरी गौर गोमेधकांती ॥३६॥

विराजे जशी मूर्ति मीनध्वजाची
तनू सर्व संगीत सूलक्षणाची
दिसे खाणि लावण्य-वैरागरीची
प्रभू देखतां हाव पूरे मनाची ॥३७॥

भुपाळें किती मानिला गौरवीला
प्रभू रत्नसिंहासनीं बैसवीला
किती अंबरें भूषणें भूपतीला
प्रभू रत्नमंडीत दे सूमतीला ॥३८॥

प्रवाळाधरा सुंदरा सुंदरेसीं
सख्या सांगती सौख्य राजांगनेसीं
बरा नोवरा रम्य लावण्यरासी
दिजे कन्यका दान यैा[31] भूवरासी ॥३९॥

इंद्रवज्रा[32] :- सिंहासनीं सुंदर सिंह जैसा

---

३० वृत्ताचें नांव दिलें नाहीं. ३१, हा शब्द समासांत आहे. ३२. मुळांत 'वज्रा' आहे.

तारांगणीं राजित चंद्र तैसा
लावण्य-रत्नाकर दिव्यखाणी
बोले मुखें अमृत[३३] शुद्ध वाणी ॥४०॥
राजांगना राजित पंकजाक्षी
वृंदानना दाटलिया गवाक्षीं
बिंबाधरा दाविति खंजनाक्षी
चंद्राननेलागुनि अंबुजाक्षी ॥४१॥

प्रमाणिका: सखे सभाग्य नोवरा । विराजमान साजिरा
विचार अन्यथा सरा । करा नृपासि सोयरा ॥४२
वदे नृपांगना[३४] सती । सभाग्यवंत मालती
अपार पुण्यसंपती । विशेष साधिल्या किती ॥४३

स्वानंदछेंद[३५] :- कर्पुरगौरा सुंदर गौरी
कीं पुजिली इनें मंगळ गौरी
यास्तव हा वन निर्जळ गौरी
हृदयीं धरि तूं ईश्वरगौरी ॥४४॥

भुजंगप्रयात :- इनें पूजिली भक्तिभावें अपर्णा
उमा तुष्टली अंबिका अन्नपूर्णा[३६]
पती पावली चंद्रहास्य सख्यांहो
मही मान्य हा मालतीलागि नाहो ॥४५॥
वदे माय हेमावती मालतीची
प्रभू मानला मूर्ति या भूपतीची
कुमारी निधी साजिरी संपतीची
नृपाळासि द्या कन्यका सूमतीची ॥४६॥

प्रमाणिका :- वदे नृपाळ नागरा । प्रभू कृपाळ सागरा
सभाग्यवंत नोवरा । दिजे कुमारि भूवरा ॥४७॥

---

३३. अंमृत, ३४. नृपांगणा, ३५. हें नांव वृत्तदर्पणांत नाहीं. ३६. आंनपुर्ना,

भुजंगप्रयात :- पहा पां इळापाळ लावण्यलीळा
रूपें आगळी मालती पुण्यशीळा
पुजा भूप राजोपचारें भुपाळा
नृपाळार्पण हे करा राजबाळा ॥४८॥
प्रवाळाधरा सुंदरा शुद्धचित्तें
वदे हाटकांगी क्षमापाळकातें
परी नेटका जोडला कन्यकेतें
दिजे रत्न बाळा कुळींद्रात्मजातें ॥४९॥

वसंततिलका[37] :- बोलाविले गणक पंडित जे सुबुद्धी
त्यांतें म्हणे नृप पहा शुभ लग्नसिद्धी
या सुंदरा भुवननायक-भूपतीला
म्या दीधलें सगुण चंपकमालतीला ॥५०॥
ते बोलती गणक पंडित भूमिपाळा
[38]सूदीन आज रविवासरसे भुपाळा
छत्तीस गूण घटितार्थ सुलग्नसिद्धी
माताग इंदु घटिका वदले सुबुद्धि ॥५१॥
यानंतरें नगरनायक[39]कामिनीसी
लावा म्हणे हळदि चंपक[40]मालतीसी
राजांगना कनककांतिकळा कुमारी
बोलाविल्या निजसया सखिया सुनारी ॥५२॥

शार्दूलविक्रीडित:-
बारा चंद्रकळा समान सकळा संबोधका कामिनी
सोळा पुण्यशिळा सभाग्य अमळा संनीध सूलोचनी
लीला हेमकळा चतुष्ट कमळा सा सप्तकें योगिनी
बाळा सा अबळा नवाष्टे[41] अचळा विलासिनी उन्मनीं ॥५३॥

---

३७. मुळांत इंद्रवज्रा आहे. ३८. सुदिन, ३९. 'कामीकासी' असें मुळांत आहे. 'का' ची 'नो' मी केली. ४०. मुळांत 'पचंक' आहे. ४१. नवाम्,

भुजंगप्रयात :- विराजे बरी हेमताटीं हरिद्रा
मनोरम्य आधीं उमा भाळचंद्रा
तुराचा किती कानकल्लोळ जाला
प्रितीनें किती रम्य अभ्यंग[४२] केला ॥५४॥

प्रवाळाधरा रम्य इंदुवगात्रा
हरिद्रा तितें लाविती खंजनेत्रा
सखी नेसली लाल सेला सुमित्रा
किनी सज्जिनी लाल सेला पवित्रा। ॥५५॥

द्रुतविलंबित : सनक साधु सखे श्रुतिसाधनी
गणक संत महंम शिरोमणी
कनककांति कळा कुळकामिनी
शशिकला सकळा शुभ स्वामिनी ॥५६॥

मुनि महंत मुखें म्हणती गिरा
नृपवरा चतुरा करिजे त्वरा
समिप लग्नघडी सुखसागरा
गुणधरा मधुरा मधुपर्क करा ॥५७॥

वसंततिलका[४३] :- तमोघ्न अस्त समयीं घटिकेसि घाली
यानंतरें सकळ आयति सिद्धि जाली
सूलोचना सगुण सुंदर सूमनाची
घे हातवा करवली सखि मालतीची ॥५८॥

इंद्रवंशा[४४] :- यानंतरें राजित राजयाला
संनीध मंत्री मधुपर्क केला
हेमांबराचा पट मध्यभागीं
सुंनोवरा संनिध हाटकांगी ॥५९॥

---

४२. अभ्यांग, ४३. वनमाळाछेंद, ४४. कवीनें या वृत्ताचें नांव दिलें नाहीं.

द्रुतविलंबित :- धरुनि हेमकळा कळसाप्रती
भुप उभा सखि संनिध सूमनी
विमळ लग्नघडी द्विज रक्षिता
कर[४५]वल्यावरि टाकिति अक्षता ॥६०॥

मंगळाष्टकें :—आधीं वंदुनि आदरें गणपती ते सारजा सुंदरा
शंभू भैरव रेणुका गिरिसुता शाँ[४६]कांबरी गोचरा
सीता राघव मारुती ऋषिमुनी तीर्थे क्रिया खेचरा
शास्त्रें वेदविधान यागसदनें देयादळं मंगळम् ॥१॥

आतां ते नवनाथ सिद्ध सकँ[४७]ळे श्री काळिका हिंगुळा
मुद्रा आगम इंदु सूर्य उदधी श्रीयोगिनी मंगळा
दिक्षा साधन मंत्र यंत्र-पुजनें श्रीशोभवी मंडळा
पृ[४८]थ्वी मारुत आप तेज गगन देयादळं मंगळं ॥२॥

कृष्णा भागिरथी भिमा नरबदा गोदावरी हीमँ[४९]ती
कावेरी मनकर्णिका हयग्रिवा मंदाकिनी गोमती
[५०]कॉळिंदी यमुना गुणा परणिता देवंती भोगावती
शरयू वैतरणी मधुमती देयादळं मंगळं ॥३॥

गोदा नारद सिंधुफेन दुधता पद्मावती कोयना
पीनाकी प्रहरा सुवर्णनलनी पूर्णावती कामना
तैसी सिं[५१]धुवती कयाधु वनजा श्रीतुंगभद्रांगना
शोभे पिंग[५२]ळेगंडिका श्रीगरुडा देयादळं मंगळं ॥४॥

प्रमाणिका :- तदेव लग्नसिद्धि हे सुदीन आजि बिंबला
उडुंगणादि चंद्रमा वळेंकरूनि तुंबला
विबुध देव वेदही स्मरूनिया अवंनिला
कृपाळु पार्वतीपती मनांतरांत चिंतिला ॥६१॥

---

४५. करउल्या, ४६. शाखांबरी, ४७. सकळै, ४८. पृथवी, ४९. 'हीमति' असा शद्व दिसतो. ५०. काळिंद्रि. ५१. सीधवती, ५२. पीगळगंडीका,

मालिनी :- सुचित सकळ आता सावधाने प्रसंगें
त्यजिति करँवेलया त्या अक्षता लागवेगें
मुखभरि घटिकेची पूर्ण पाहोनि निष्ठा
वदति द्विज त्वरेनें सादरें ॐ प्रतिष्ठा ॥६२॥

प्रमाणिका :- अनेक वेद उत्तरी विचित्र पंत्रे सूटला
नृपाळ नायकामनीं आनंद सिंधु दाटला
अपार मंगळ तुरें नभांत नाद थाटला
मालती-मनांतरीं सुखाब्धिपूर लोटला ॥६३॥

द्रुतविलंबित :- वरकरीं नवरीकर रंजले
सुतविली सुततंतु विराजले
प्रगट पाणवटीं वरि कंकणें
बांधिली द्विजवरी श्रुतिसाधनी ॥६४॥

भुजगप्रयात :- पुढें चित्रिचा चूत सिंपोनि मानें
करी व्रीहि लज्जा किजे होम तेणें
नमस्कार केला बरा मालतीनें
त्वरें वेदिली हाटकांगी प्रितीनें ॥६५॥

शुद्धकामदा :- वधुवर बरीं भोवलेंथावरी
दंमति संनिधें सुंदरें वरीं
नृपवधू वदे काय यावरी
आणिजे वरा सखिगृहांतरीं ॥६६॥

भुजंगप्रयात :- अनुज्ञा प्रमाणें मृगाक्षी निघाली
वरी मंदिरांतूनि बाहीर आली
वरासंनिध बोल बोलों निघाली
चला भोजनाला क्षुधावेळ जाली ॥६७॥

---

५३. हा शब्द 'पछ' असा लिहिला आहे. ५४. 'चुत', ५५. विहर्चे, ५६. कवि ह्या वृत्तास 'सुगरीनीछंद' म्हणतो. ५७. बोवल्यावरी, ५८. कवीनें वृत्ताचें नांव दिलें नाहीं.

कौमदा :- पाहिलें वरें कामिनीकडे[59]
घेतली त्वरा मालती कडे
(क) विजनी[60] जना रीति आवडे
केवि ते क्रिया अन्यथा घडे ॥६८॥

चंपकमालनी छंद:-जाउनि सदनीं सुंदर ईशा
जालें भोजन मंगळधीशा
विराज नेत्रीं घेउनि रामा
आला मांडित मंडपधामा ॥६९॥

भजंगप्रयात :- कुमारी सख्या सुंदरा मालतीच्या
सख्या संनिध खंजनाक्षी गुणाढ्या
प्रिती रंजका रंजवीती तयला
कवी रामसुतात्मजें ग्रंथ केला ॥७०॥

प्रसंग आठवा श्रीकृष्णार्पणमस्तु

---

५९. 'कासीनीकडे' असा शब्द आहे. ६०. मुळांत 'विजना' आहे. अर्थाला अनुकूल म्हणून मी कंसांत. 'क' घातला.

# प्रसंग नववा

तोटकछंद :– रजनीकर हाय म्हणे भुपती
परिसा प्रभु यकि असे विनती
महिपाळ प्रधान घरीं भुवरा
शुभ वासर आजि असे तिसरा ॥१॥
सवें यउनि आजि कृपाळनिधी
करि सत्य सनाथ दया-उदधी
नयनीं पाहा पार विधान विधी
कमनीय करी करुणा-जळधी ॥२॥

भुजंगप्रयात :– म्हणे कौंतळाधीश सेनापतीतें[1]
करा सज्जे[2] सेना चला मंडपातें
त्वरें मान खालाउनी भूपतीला
चमू सज्ज केली क्षणामाजि आला ॥३॥
दुदुंभी दणाणीत भारें दुरंगी
अगड धों दमामे धिडिं ढोल जंगी
धडाडां धडाडीत नादें नगारे
भडाडां भडाडीत भेरी तुतारे ॥४॥
मदोन्मत मौतंग[3] लोटे किंकाटे
किती चालतो अश्वथाटे चपेटें
रथीं जोडिलीं चक्र वाटें निघोटें
किती पाइचे लोटले वीर लोटें ॥५॥
कडाडां नभीं बाण भांडीं प्रचंडें
धडाडीत घाघाटतीं चंडखंडें

---

१ शैयनापतीतें. २ सज. ३ मातांग.

भरारां नळे सूटती औषधीचे[४]
तरू पुष्पमंडीत दावाग्नळाचे ॥६॥
दिशा दाटल्या चंद्रज्योती[५] उजोडें
पडे चांदिणें दामिनीतेज थोडें
कळेना निशा ना दिवा पारपाडे
कळेना जना प्रात संध्या निवाडे ॥७॥
विशाळें निशाणें विराजीत छत्रें
कितीं डंबरें साजिरीं सूर्यपत्रें
किती डोलतीं चामरें मीनयंत्रें
पताका गुढ्या रंग चित्रें विचित्रें ॥८॥

प्रमाणिका :– अचाट भाट ते किती। बिरदें कडक बोलती
चळीं भुपाळ कांपती। प्रभूप्रताप वर्णिती ॥९॥

भुजंगप्रयात :–पुढें नृत्यती नृत्यकारा सुरंगी
कळा राग उच्चार सारंग आंगी
श्रुतीसार थोंगीत आंगी मृदांगी
किती मान साहित्य संगी उपांगी ॥१०॥

प्रमाणिका :–नृपाळ रत्नभूषणीं। आरूढला सुखासनीं
असंख्य दीप लावणी। किती हिलाल तीखणी ॥११॥

वृत्त[६] :– अंदु जोड जडियले ज्या भीम हस्तीवरी
ढाळा चामरडोल झळके सुढाळ रत्नें[७] बरीं
मध्यें मंगळ मंडणे वधुवरें मंडीत हेमांबरीं
सारे सुंदर दीपिची सुनयनीं शोभा दिसे साजिरी ॥१२॥

---

४ औशधाचे. ५ चंद्रजोती. ६ पोथींत या वृत्ताचें नांव 'शृग्धरा' दिलें, पण यांतील तिसरा, चवथा हे चरण शार्दूलविक्रीडिताचे आहेत; आणि पहिला, दुसरा चरण भिन्न आहेत. ७ रत्न.

भुजंगप्रयात :—पुढें पातले वेत्रपाणी नृपाचे
नमस्कारिला दुष्टबुद्धी विसंचे
सभे सांगती संनिध सूमनाचे
समाचार साकल्य केला सुवाचे ॥१३॥

प्रतापें नृपें पादपद्में नृपाचीं
प्रभूनें पणें पूजिलीं भूपतीचीं
कुळींद्रात्मजा कन्यका कौंतळाची
पयाब्धीसुता प्राप्त जाली भुपाची ॥१४॥

पहा पैल पां भूपपाळा भुधीशा
सखीसंनिध मालती चंद्रहास्या
पताका ध्वजा छत्र माही निशाणें
गजारूढ दोघे पुढें सूर्यपानें ॥१५॥

तयाची मनीं मात कांहीं न मानी
म्हणे जीभ तोडा खुडा पाद पाणी
मुखें जल्पते ते चिरा पापवाणी
त्वरें शीर मुंडा करा दंड कोंणी ॥१६॥

पुन्हा भूपती दूत दावीत हातें
पहा पैल नागासनीं राजपंथें
वृथा कोप ना पैल पाहा पताका
उजेडें जसें चांदिणें पूर्ण राका ॥१७॥

ऋषी तापसी सिद्ध साधू समेळे
पहा पैल पां पातलें भूपजाळें
पुढें संनिध पावली शीघ्र सेना
ध्वनी ऊठल्या कानकल्लोळ नाना ॥१८॥

---

८ भेस अशीं अक्षरें आहेत. ९ पनें. १० कोन्ही. ११ उज्येड.

वसंततिलका :–वोसावला मुखमयंक मनीं विराला
चिंतानदी प्रगटली पुर आवरीला
अंबालयाप्रति पुजे रिपु पाठवीला
कैसे रिती नृपवरें मनिं आठवीला ॥१९॥

तोटक :– किति दाखवि रंग सुरंग जनीं
हित रंग विरंग कळा वदनीं
भरला मन भंग अभंग मनीं
सुखसंग निसंग नसे सदनीं ॥२०॥

भुजंगप्रयात :–[१२]त्वेरेनें पुढें पावला दुष्टबुद्धी
नमस्कारिला कौंतळाधीश आधीं
सुमानें सभामंडपीं बैसवीला
समस्ता जना मान सन्मान केला ॥२१॥

वृत्त[१३] :– अगरु केशर कस्तुरी कमनीय तीलक चर्चिला
रम्य परिमळ पत्रमिश्रित[१४]चारु चंदन चर्चिला
रत्नमंडित भूषणांबरिं भूपती प्रिति पूजिला
वीषयावर वीर राजित मालतीसह सज्जिला ॥२२॥

भुजंगप्रयात :– किती पूजिले संत साधू सभेसी
रुषी तापसी तीर्थवासी विदेशी
महासिद्ध पंडीत आरे[१५]ण्यवासी
प्रितीनें पुजी पूरवासी विलासी ॥२३॥

प्रितीनें ईसी वीषया[१६] आणविली
वरासंनिध सुंदरा बैसवीली
मुळारंभ सांगातिणी मालतीची
विशेषें[१७] सखी प्राणे[१८]वेशी प्रितीची ॥२४॥

---

१२ त्वरेन. १३ पोथींत या वृत्तास मनीभद्रा छेंद म्हटलें आहे. १४ च्यारु. १५ अरन्येवासी. १६ विशया. १७ विशेसें. १८ प्रानवेंसी.

शार्दूलविक्रीडित[19] :-

दोघी खंजनलोचना कनकभा दोघी मयंकानना
दोघी राजित राजसा कृशकटी दोघी कुरंगानना
दोघी हेमकळा सभाग्य कमळा दोघी[20] प्रवाळाधरा
दोघी पुण्यशिळा कळाब्धिकुशळा दोघी रुपें नागरा ॥२५॥

वसंततिलका[21] :-दोघीजणी निज मनीं मन सूमनाच्या
दोघीजणी जिवलगा जिव जीवनाच्या
दोघीजणी सगुण सुंदर सूमतीच्या
दोघीजणी सुरस संनिध संगतीच्या ॥२६॥

भुजंगप्रयात:- इळापाळकातें म्हणे दुष्टबुद्धि
असे भूवनीं पाकसाहित्य सिद्धी
दयाळा उठा भोजनालागि आधीं
कृपाळा करावी कृपा शुद्धबुद्धी ॥२७॥

प्रमाणिका:- मुनी महंत सूमती रुषी भुपाळ भूपती
सखे समस्त संपती जनासहीत पंगती ॥२८॥
वरासनीं हरीवरें । विराजलीं वधूवरें
सख्यांसहीत सुंदरें । सुरंग रंगलीं भरें ॥२९॥

भुजंगप्रयात:- बरीं रत्नखचीत गोमेधताटें
मनोरम्य विस्तीर्ण जीर्ण जुनाटें
मेंधें[22] रंगली रत्नवाटे निघोटें
स्वैयंभें[23] सदा बिंबलीं बिंबें[24] मोटें ॥३०॥

द्रुतविलंबित: कनककांतिकळा कमळानना
सुरस वाढिति वारिजलोचना
नवजणी सजणी मनमोहना

---

१९ स्रग्धरा. २० घी दो. २१ भुजंगप्रयात. २२ मध्यें. २३ स्वयभें. २४ बीब.

चपळ चंद्रमुखी चितचेतना ॥३१॥
निजगती जगती गजगामिनी
निजमती सुमती मतिमाल्हनी
विमळ पंचक पंच विलासनी
शिखेरिणी[२५] तरुणी सम साजणी ॥३२॥

चामरः[२६]– नीवडूनि सार जें अपार सार काढिलें
लेहे पेह चोष्यें[२७] खाद्य खंजनाक्षे वाढिलें
पंचचामरः– करुनि तृप्ति पंगती क्षुधा ढिसाळ तोडिलें
करी प्रधान प्रार्थना करद्वयासि जोडिलें ॥३३॥

भुजंगप्रयातः– सख्या संनिध मालतीच्या करुशांगी
किती हासती मेहुण्या हाटकांगी
पती दोप्रियांच्या शिरीं पाप वाहे
नृपाळा पुढें थोर वीटंबना[२८] हे ॥३४॥
धरूनी करीं राजयालागि कानीं
नृपाळा पहा नृत्यवीती निदानी
जसे नाचवीती मनोरम्य कामी
तसें पूर्ण नाचाल सौंसारधामीं ॥३५॥
विडे सर्व लोकांसि देऊनि मानें
बहूसालें[२९] आतिथ्य केलें[३०] प्रधानें
पुढें बोलती राजमंत्री भुपाळा
चला भीम भद्रासनीं भूमिपाळा ॥३६॥
उठे दूरुष्ठबुद्धि गृहामाजी गेला
विवेकें म्हणे काय निजांगनेला

---

२५ सीखरनी. २६ मुळांतील नांव प्रमाणिका, पण यांत १,२ चरण चामर वृत्ताचे आणि ३, ४ चरण पचचामराचे आहेत. २७ चोश्ये २८ विटंबना. २९ बहुसाल्य. ३० कळें.

गृहामाजि आणा वरा विषेयेला[31]
वरा रत्नशृंगार द्या मालतीला ॥३७॥

वदे यावरी वारिजाक्षी दुतीतें
म्हणे जाय गे औणि[32] वेगी वरातें
अनुज्ञाप्रमाणें प्रगल्भा निघाली
वयस्या[33] सभेसंनिध शीघ्र आली ॥३८॥

प्रमाणिका:– षदोनि रम्यॆ[34] उत्तरें। वधूवरासि आदरें
गृहांतरांत आणिलीं। वरासनीं विराजलीं ॥३९॥

भुजंगप्रयात:– पुसे राजमंत्री मनोरम्य वाणी
कसी पूजिली आदिमाया भवानी
विराजीत साजे पुजा पात्र पाणी
कसी भूपतीभेट जाली निदानी ॥४०॥

वृत्त[35] :– चंद्रहास्य[36] म्हणे करुणालया
घाडिलें मजें[37] तुम्ही अमरालया
दुर्गद्वार शुभ राजित जेथें
भेटले मदनजी मज तेथें ॥४१॥

प्रमाणिका:– असे मनांत भंगला। सुरंग तो विरंगला
पुसे तरंग तुंबला। कुरंग-रंग बिंबला ॥४२॥

द्रुतविलंबित:– मज म्हणे भुपती सुखसागरा
तुज निमित्य[38] महीनृप नागरा
निज नये नयनीं गुण–आगरा
द्या पुजा तुम्ही जा भुपमंदिरा ॥४३॥

---

३१ विशयला. ३२ अनि. ३३ वयशा. ३४ रंम्य. ३५ पोथींतील नांव द्रुतविलंबित, पण या वृत्तांत 'यूथिका' आणि 'स्वागता' यांचें मिश्रण आहे. ३६ चंद्रहासे. ३७ 'मतुजम्ही' अशीं अक्षरें पडलीं आहेत. ३८ नीमीत्य.

रथ तुरंग सुरंगित रंगले
मुळ तुम्हां गजरें गज धाडिले
जनसमूह[39] बिदीं कट थाटले
जा प्रभू झडकरी भुप बैसले ॥४४॥
मदनजी मज[40] म्हणे नृपनंदना
त्वरित जाय सख्या भुपभूवना
चंडिका चरणांबुज-पूजना
त्वरित जाइन मी निजरंगणीं[41] ॥४५॥

भुजंगप्रयात :– पुजापात्र घेऊनि तैसा निघाला
महावीर अंबालयालागि गेला
सवें शीघ्र सेनापती आदरेंसी
मला धाडिलें भूपधामा त्वरेंसी ॥४६॥

वृत्तें[42] :– भेटला नृप मला सुखसंपती
दीधली सगुण चंपकमालती
सकळ राज्य विराजित अर्पिलें
शिळें[43] सिंहासन सत्य समर्पिलें ॥४७॥

भुजंगप्रयात :– मनीं खोंचला राजमंत्री विराला
दुराशा बहू सौख्यसिंधू जिराला
महा भीम चिंतानदी वाड जाला
मनीं चोजकें दुःखडोहीं बुडाला ॥४८॥

प्रमाणिका :– विशाल दुःख वाटलें मनांतरांत दाटलें
क्रियातडाग आटलें मनींच सर्व घोंटलें ॥४९॥

भुजंगप्रयात :– मनीं थोर जाजावला दुःख देहीं
भ्रमें भूलला भ्रांतिचिंता प्रवाहीं

---

३९ समोह. ४० जीमज हीं अक्षरें समासांत आहेत, ४१ रंगना. ४२ पोथींत नांव 'वज्रा' असें आहे. यांत १,२ चरण 'यूथिका' वृत्ताचे आणि ३,४ द्रुतविलंबिताचे आहेत. ४३ सीळ सीहासन.

भयाभीत भांबावला शुद्धि नाहीं
स्मरेना तया देह गेहादि कांहीं ॥५०॥

कुकर्मी गृहांतूनि बाहीर आला
त्वरें भूप भद्रासना बोळवीला
पिशाचापरी शीघ्र अंबालयाला
स्मशानीं महाभूत तैसा निघाला ॥५१

पुढें दुष्टबुद्धीसि देखोनि दृष्टी
पळे भूतमेळा धरी धाक पोटीं
कळेना असे राहिला कोण बेटीं
पळा रे झणी हा गिळी भूतथाटी ॥५२॥

द्रुतविलंबित :- भ्रमित भ्रांतिभरें भुवनांतरीं
स्मरत भीम भरें भुवनेश्वरी
तवें[44] पुढें पडला विर केसरी[45]
मदन खंड-विखंड महीवरी ॥५३॥

सकळ रंगण श्रोणित तुंबलें
शरिर सुंदर सर्व विचंबलें
स्फटिकबंध निजांगण रंगलें
सदन चर्चित रक्त वि(रं[46].) गलें ॥५४॥

तोटकः- विखुरे मद मांस[47] महीवरुतें
पडलें मुखपद्म तनूपरतें
सुटला कचभार रुळे धरणी
पडला भिम रक्तसडा रंगणीं ॥५५॥

भुजंगप्रयातः- पुढें राजमंत्री पडे दुःखदेही
बुडाला असे शोकचिंताप्रवाहीं

---

४४ तवे. ४५ केशरी. ४६ येथें मुळांत एक अक्षर उणें आहे. कंसांतील अक्षर मी घातलें आहे. ४७ मांश.

शिळाघात हांणे[48] करें मस्तकातें
गतप्राण जाला निघे मृत्यपंथें ॥५६॥
असो ईकडे भूपती भूपमेळा
समारंभभारें सर्वे लोकपाळा
इलापाळ भद्रासनालागि आला
सभामंडपीं मंडनाकार जाला ॥५७॥
वरासंनिध वीषेया[49] वारिजाक्षी
दुजी मालती रम्य रामा म्रुगाक्षी
सखी कौंताळाधीश कांतांबुजाक्षी[50]
सख्यासमतें वावऱ्यांतूनि लक्षी ॥५८॥
द्रुतविलंबित :- सरस सुंदर ते विषेया[49] किती
अति मनोरम राजित मालती
प्रभुवधू विनवी भुपतीप्रती
करि भुपा भुपती विषयांपती[51] ॥५९॥
भुजंगप्रयात :- महीपाळ बोले मनोरम्य वाचा
करा चंद्रहास्या प्रभू कौंतळेचा
जना मानला शब्दसिंधू नृपाचा
द्विजाचे मुखीं घोषं[52] जाला श्रुतीचा[53] ॥६०॥
वसंततिलकों[54]:- वेदी विधान विधि सर्वहि सज्जें[55] केला
राज्यासनीं विर विराजित बैसवीला
भद्रासनीं भुपजनीं प्रणिपात केला
दिव्यांबरीं विर विरोत्तम[56] गौरवीला ॥६१॥
भुजंगप्रयात:- वरी दाटली दाटि चित्रें विचित्रें
मनोरम्य हेमांबरें हेमे[57] छत्रें

---

४८ हाने करे, ४९ विशया. ५० कांताबुजाक्षी. ५१ विशयाप्रतो. ५२ घोश. ५३ शृतीचा. ५४ पोथींत वृत्ताचें नांव दिलें नाहीं. ५५ सज. ५६ विरोतम. ५७ 'महे' अक्षरें उलटीं पडलीं आहेत.

किती वाजती चामरें चारु सुत्रें
प्रभा मल्छ हेलावती सूर्यपत्रें ॥६२॥

तोटक:- घन सुस्वर तंत वितंत ध्वनी
महि मंगळ कान भरे गगनीं
वदिजें ब्रिद-मंडित बंदिजनीं
किर्ति वर्णित वंशी[58] निधी वचनीं ॥६३॥

श्रुति अंग मृदांग उपांग कळा
करताळ सुताळ कळा कुशळा
उपराग विराग गेती[59] चपळा
किति नृत्यति नृत्य बळें अबळा ॥६४॥

भुजंगप्रयात :-किती हेम हेमांबरें आणवीलीं
किती याचकें तृप्ति[60] संतृप्ति केली
सखी सज्जनें सर्वही[61] गौरवीलीं
निशा कर्मिलीं[62] प्रांतसंध्या[63] उदेली ॥६५॥

पुढें मंगळस्नान केलें प्रभूनें
पुजी देव द्विजोत्तमालागि मानें
करी भूपती हेम-गोदान दानें
नमस्कारिला कौंतळाधीश मानें ॥६६॥

बसे भीम भद्रासनीं भीम भारें
किती पूजिला राव राजोपचारें
मिळाले किती लोक सर्वाधिकारें
नमस्कारिला भूपती निर्विकारें ॥६७॥

---

५८ मुळांत 'वंश' आहे. मी अर्थानुरोधानें 'वंशी' शब्द मानून त्याचा 'वंश' केला. ५९ 'ग' हें अक्षर पृष्टावरील समासांत आहे. ६० येथें 'प्ती' ह्या अक्षरामागील अक्षर वाचतां येत नाहीं. मात्र त्यांतील 'उकार' स्पष्ट दिसतो. यास्तव मी तें 'त्रु' समजून 'त्रृप्ती' असा पाठ निर्मिला. ६१ 'ही' हें अक्षर पानावरील समासांत आहे. ६२ कर्मली. ६३ प्रांतसध्या.

प्रमाणिका :- सभासमूह गाजला । नभांत कान माजला
प्रभू पटीं विराजला । सुरंग रंग सजला[६४] ॥६८॥

भुजंगप्रयात :- सभामंडपीं दाटि जाली जनाची
विराजीत राजे कळा कीर्तनाची
पटीं भूपती मूर्ति मीनध्वजाची
वदे भारती रामसुतात्मजाची ॥६९॥

प्रसंग नववा संपूर्णमस्तु

---

# प्रसंग दहावा

भुजंगप्रयात :- प्रभाता पुजारा पुजेलागि गेला
पुजा-पात्र पाणी उठो जागवीला
करीं अंबु अंबालयालागिं आला
पुढें देखिला दुष्टबुद्धी निमाला ॥१॥

द्रुतविलंबित :- भ्रमित भूलिभरें भुवनांतरीं
भिम भयानक श्रोणित भूवरी
वि[१]धडला पडला विरकेसरी[२]
मदन खंड विखंड महीवरी ॥२॥
सदन चर्चित श्रोणित तुंबलें
शरिर जर्जर सर्व विसंचलें
स्फटिकबंद निजांगण रंगलें
तनुसि भिन्न मुखांबुज भंगलें ॥३॥

---

६४ सजला.

१ 'वि' हें अक्षर चाईनें खाल्लें आहे. २ केशरी.

गुरव भीम मनोदय भंगला
सकळ रंग सुरंग विरंगला
मनिं भयाभित होउनि संचला
भ्रमित पार विचार विसंचला[3] ॥४॥

भुजंगप्रयातः- किती यक भांबावला आणि भ्याला
असे भ्रांतलासा पुरीमाजि आला[4]
गती मंद कंपीत या चालवेना
वदे दीनं[5] वाचा बळें बोलवेना ॥५॥
म्हणे आजि[6] अंबालयी[7] दुष्टबुद्धि
निमाले पिता[8]पुत्र दोघे सुबुद्धि
कळेना रिपू[9] कोण कोपी कुबुद्धि
दुरात्मा दुराचार वेधी विरोधी ॥६॥
अभावें विकारें विरे वैर बंडे
भुमी पाडिली खंडखंडें विखंडे
तनू भिन्न[10] यकीकडे रुंडमुंडें
कशीं खंडिलीं चंड दोर्दंडदंडें ॥७॥
पुरीचीं जनें (सर्व)[11] वेडावलीसीं
उभीं राहिलीं दीन काचा(ट[12])लीसीं
खिदी दाटली दाटि जाली जनाची
किती बोलतीं तर्क नानापरीचीं ॥८॥
नवा भूप भद्रासनीं बैसवीला
कळेना कसें राजमंत्री निमाला

---

३ 'ला' अक्षर चाईनें खाल्लें आहे. ४ येथील कागदाचा पापुद्रा उडून गेला म्हणून अक्षरें स्पष्ट नाहींत. तीं 'अनी' अशीं वाटतात; आणि 'आला' हा शद्ब तर 'पाला' असाच दिसतो. ५ दिन. ६ अजी. ७ आबालई. ८ 'पीता. ९ रीपु. १० भीन. ११ 'स' कार अर्धा दिसतो. 'र्व' मधील रेफच दिसतो. अर्थानुरोधानें 'सर्व' शद्ब मी घातला आहे. १२ 'ट' हें अक्षर मी भरलें आहे. मळांत येथील कागद फाटला आहे.

सभामंडपीं लोकमेळा मिळाला
प्रभूला समाचार साकल्य[13] केला ॥९॥
इळापाळका आजि अंबालयातें
पुजारा प्रभातेसि गेला पुजेतें
न जाणे (रि[14])पू कोण संतापतापी
असे मारिला दुष्टबुद्धी सकोपी ॥१०॥

द्रुतविलंबित:–स्फटिक-बंद निबंद महीवरी
विघडले पडले विर केसरी
महितळांगण श्रोणित सांतथरी
विखुरले सरले विरकेसरी ॥११॥

महिवरा चतुरा नरनायका
करि वरा सधिरा रिपु ठाउका
नरविरा अमरा अरि-अंतका
वरविरा विवरा[15] वरदायका ॥१२॥

विबुधप्रिया[16]:– ऐकतां जन आणि विठ्ठल वीरनायक वीटला
शंकला धिर कौंतळापुरि-राज सत्वर ऊठिला
चालिला जन कंठ[17] दाटत सिंधु जेपरि लोटला
नगर – नागर – नायकामनिं थोर विस्मय दाटला ॥१३॥

भुजंगप्रयात:– त्वरें भूप अंबालयालागि आला
पुढें देखिले वीर नेत्रीं विराला
निजेला मही मृत्यु[18] दोघाजणांला
मनीं खोंचला भूप विस्मीत जाला ॥१४॥
तनू छेदली छेद केला शिराचा
मही सप्तखंडें सडा श्रोणिताचा

---

१३ साकल्ये. १४ 'रि' अक्षर स्पष्ट नाहीं. कागद फाटला आहे. १५ हा शद्ब समासांत आहे. १६ नांव दिलें नाहीं १७ कट. १८ मृत्ये.

वदे चंद्रहास्या प्रभू सूमतीचा
पडे मार्ग ठाई कसा दुर्मतीचा ॥१५॥
वधी यांसि चांडाळ काळस्वरूपी
करा ठाउका कोण संताप-तापी
कसा निर्दयी[19] तो दयाहीन पापी
दुरात्मा दुराचार कोपी कुरूपी ॥१६॥
वदे भूपती काय तेव्हां जनांला
विचारा जनीं बोल आम्हांसि आला
नवा भूप भद्रासनीं बैसवीला
दुजे वासरीं हा असा घात जाला ॥१७॥

प्रमाणिका:—निके वदोनि भूपती। विवेक बोलिला किती
त्यजूनि[20]यां अहंमती। करा प्रसन्न[21] सूमती ॥१८॥
कितेक सन्निध रुषी। मुनी महंत तापसी
किती विबुध[22] ज्योतिषी। करूनि बुद्धि[23] मानसीं ॥१९॥

भुजंगप्रयात :- वदे चंद्रहास्या प्रभू पुण्यवाणी
पुजूं अंबिका आदिमाया भवानी
परा-पार अगोचरा प्राणदानी
दयाळा दयासिंधु आम्हां निदानीं ॥२०॥
भुमी साधिली कुंड विस्तीर्ण मंत्रे
तया भोंवतीं अष्ट-षट्[24]कोन-यंत्रे
मुळीं स्थापिल्या योगिनी योगसूत्रें
किती रंगलीं पूर्ण पात्रें विचित्रें ॥२१॥

शार्दूलविक्रीडितें[25] :-
आदीनाथ[26] तथा गुरू गणपती संयुक्त वीरावली
पीठें भैरव सिद्ध[27] कर्म बहुही हे शोभले श्रीदळीं

---

१९ नीर्दई. २० 'नि' हें अक्षर समासांत आहे. २१. प्रसन. २२ जोतीसी. २३ बुधी. २४ शट्कोन. २५ पोथींतील नाव शृग्धरा. २६ अधीनाथ. २७ सींध.

शास्त्रें शांभव वेद मंत्र मदिरा भागीरथी भूतळीं
केली पूर्ण पुजा शिवेप्रति[२८] वदे जोडूनि बद्धांजुळी[२९] ॥२२॥

प्रमाणिकाछंद:- अई जगत्रजननी । विराजसी जनीं वनीं
शिवे[३०] पतीतपावनी । करी त्वरीत धावनी ॥२३॥

निर्बंद्ध[३१] चिंतिती[३२] मुनी । प्रबुद्ध[३३] तुर्य उन्मनी
स्वयंभ सिद्ध योगिनी । विलंब लाविसी झणी ॥२४॥

समूळ सर्ग-मंडळ । भरूनिया भुमंडळ
पुरूनि ऊरसी बळें । स्वरूप रूप तुंबलें ॥२५॥

छंद तोटक वनमाळा :-

क्षर अक्षर अक्षय तूं जननी
सचराचर सार जनीं विजनीं
निगमागम माय तुझे भजनीं
स्मरती सुर सिद्ध दिवा रजनी ॥२६॥

भुजंगप्रयात :- मुळारंभ चैतन्य-माया शिवे तूं
करी कोटि ब्रह्मांड-माळा तुझी तूं
शिवे[२८] आदि ऑकार[३४] बीजाक्षरे तूं
सदानंद ऑनंदलें[३५] ब्रह्म तें तूं ॥२७॥

तोटकछंद :- जळ, मारुत, अंबर, तेज, क्षिती
तुज सप्तसमुद्र, द्विपें[३६] स्मरती
सरिता सैर[३७] शैल्य जपीं जपती
त्रिपुरे करि आजि कृपा पुरती ॥२८॥

भुजंगप्रयात :- नमस्कारिली आदिमाया भुपाळें
पुढें होम ऑरंभिला[३८] शीघ्रकाळें

---

२८ सीवेप्रती. २९ बधाजुळी. ३० शीवे. ३१ निबध. ३२ चीतीती.
३३ प्रबुध. ३४ वोंकार. ३५ अनंदळें. ३६ दिपे. ३७ शर. ३८ अरंभीला.

किती पूजिल्या मंत्रशक्ती स्नेहाळें[39]
त्वरें वन्हि सन्मूख केला दयाळें ॥२९॥

प्रमाणिका:-हुताशनांत आहुती । असंख्य[40] घातल्या किती
त्यजूनिया अहंमती । करी शिवेसिं[..] वीनती ॥३०॥

भुजंगप्रयात :- तनूमांस छेदूनि वेगी भुपाळें
किती वन्हि सन्मूख[41] केला कृपाळें
असंभाव जाणोनिया आदिमाता
वदे अंबिका रे प्रभू माग आतां ॥३१॥

प्रमाणिका:-वेद भुपासि अंबिका । प्रसंन्न मी भुपाळका
शिवा सभाग्यसूमती । भुपासि भाष[42] दे प्रिती ॥३२॥

द्रुतविलंबित :- प्रभु म्हणे जननी जगदंबिके
करि करुपा करुणाकर अंबिके
जिववि या मदना वरदायके
धिर दया करि या सुरनायके ॥३३॥

भुजंगप्रयात :- वदे चंद्रहास्या प्रभू अंबिकेला
अवो ऊठवी[43] माय दोघा जणांला
करी यासि तूं अंबिके दिव्यदेही
तुला मागणें अन्य[44] आणीक नाहीं ॥३४॥
वदोनी निकें आदिमाया सुवाणी
अकस्मात अदृश्य[45] जाली भवानी
उभे संनिध लोकें[46] राजा प्रतापी
उभे ठाकले वीर लावण्यरूपी ॥३५॥

तोटकें[47] :- प्रभुसंनिध संत महंत मुनी
अवघे जन विस्मित होय मनीं

---

३९ स्नेहाळें. ४० असंख्य. ४१ संन्मुख. ४२ भाश्य. ४३ 'ऊ' कार, 'उ' असा लिहिला आहे. ४४ आन्ये अनिक. ४५ आदृश्य. ४६ अक्षरें उलटीं पडलीं आहेत 'कलो'. ४७ ळंबीतछेंद.

पुजिली मग देवि सखी सुमनीं
म्हणती प्रभु धन्य सिमा अवनी ॥३६॥

भुजंगप्रयात :- उभा संनिध चंद्रहास्या[४८] सुबुद्धी[३३]
नमस्कारिला आदरें दूरुष्टबुद्धी
प्रिती आदरें फार संतोषवीला[४९]
महाराज-आलिंगनाला निघाला ॥३७॥

भुजंगप्रयातं[५०]:- वदे भूपती दुष्टबुद्धी भुपाळा
असे सर्व कर्ता हरी मेघनीळा
म्हणोनी तुम्ही दु:खं[५१] सांडा दयाळा
स्मरा अंतरीं विश्वपाळा करुपाळों[५२] ॥३९॥

पुढें शीघ्र सिंहासनीं बैसवीला
सुखें सूमनें सर्व संतोषेवीला[५३]
किती अंबरें भूषणें[५४] गौरवीला
समारंभभारें गृहा पाठवीला ॥४०॥

म्हणे चंद्रहास्या प्रभू दुष्टबुद्धि
तुम्ही मंत्रियांमाजि मंत्री सुबुद्धि
मला कौंतळेशें पुरी कौंतळेचें
असें दीधलें राज्य कौंताचळोंचें[५५] ॥४१॥

रथोद्धता[५६]:- मदन मंत्रि असो भुप-भूवनीं
तुम्हि रहा सदनीं हरिचिंतनीं
शिकविली निति[५७] ते धरिजे मनीं
मदन राजित बुद्धिशिरोमणी ॥४२॥

---

४८ चंद्रहाश्या. ४९ संतोशविला. ५० मनीभद्राछेंद. ५१ दुख. ५२ 'क्रुपाळा' हा शब्द समासांत आहे. ५३ शतोशविला. ५४ भुशनें. ५५ 'ळाच' ५६ चंपकमालनी- छेंद. ५७ 'ति' हें अक्षर पानाच्या वरच्या भागीं आहे.

भुजंगप्रयात :- पुढें अंबिकेतें नमस्कार केला
त्वरें भूप भद्रासनालागि आला
भुपें तात माता पुढें आणवीला
प्रिती उत्तरें फार संतोषवीला[58] ॥४३॥
असो चंद्रहास्या प्रभू कौंतलेसी
करी राज्य राजीत राजा विलासी
प्रजापाळ धार्मीक दाता दिनाचा
कृपाळू दया धीर दानी दयन्त्रा ॥४४॥
तोटक:- करितां पुरिं राज्य प्रभू हरुषें
भरलीं बरिं तीन शतें वरुषें
धरिती निजगर्भ प्रिया अबला
चतुरा शुभ हाटककांतिकळा ॥४५॥
भुजंगप्रयात :-प्रभू मालतीकारणें पुत्र जाला
असें ठेविलें नाम पद्माक्ष त्याला
विराजे वरें वीर्य[59]च्या सुताला
मयोरध्वजू नाम रंजे तयाला ॥४६॥
नृपाळा अशी[59] भक्ति भूपाळकाची
सदा साहे भावें शिळा गंडकीची
कळेना सिमा मूर्ति दामोदरांची[60]
अशीं पुण्यें तों या महीमाजि कैंची ॥४७॥
शिळा[61] सत्य सामुद्रिकें सद्गुणेसी
प्रभू द्वारका दोनि चक्रें जयसी
स्वयें होय विष्णू शिळा भक्ति यैसी ॥४८॥
वसंततिलका :-स्कंधीं शिळा धरुनि मंडित भार वाहे
तेणें धरा धरियली निजपुण्य पाहे

---

५८ विशयचा. ५९ आसी. ६० दामोधराची. ६१ ह्या श्लोकांत तीनच चरण आहेत.

संसारसिंधु तरला अघ दूरि राहे
वंदी कृतांत[63] पदपंकज चिंतिता हे ॥४९॥

शार्दूलविक्रीडित[63] :-

शाळिग्राम सुवर्ण मुक्त वसनें संकल्पिती ब्राह्मणा
धेनू गोधुम मंजुऱ्यादि सुमनें रत्न-मणी दक्षणा
तेही त्रीभुवनें द्विजांसि दिधलीं दानासि भूमंडना
तीर्थें हे कमनीय[64] कोटि घडलीं जन्मांतरा खंडना ॥५०॥

भुजंगप्रयात :- शिळा-तीर्थ सेवी पुजा मंजुरीची
करी पातकें दग्ध जन्मांतरींचीं
शिळा गंध सुगंध सूलेपनातें
धरी मस्तकीं पाय तो मुक्तिपंथें ॥५१॥
शिळानीर[65] नैवेद्य सेवी आनंदें
शिळा रम्य निर्माल्य सेवी सुगंधें
शिळातीर्थ घे भाव सद्भाव भेदें
पदें मुक्तिचीं होति शुद्धें निबद्धें[66] ॥५२॥
कुकर्मी क्रियाहीन चांडाळ पापी
दुरात्मा दुराचार आचारलोपी
शिळातीर्थ घेतां महा पुण्य-देही
तयाला प्रभू मुक्ति संदेह नाहीं ॥५३॥

तोटक[67]:- तुलसीदळ कोमळ वाहे शिळे
तुटती भवपाश[68] प्रभू सगळे
पिकलें पित पर्ण धरेसि गळे
वाहतां अघ-शैल्यें[69] समेळ जळे ॥५४॥

भुजंगप्रयात :- महा मंजुरी दीर्घ गंधें विराजे
सदा मंजुरीमाजि विष्णू विराजे

---

६२ कृदांत. ६३ छेंदशृग्धरा. ६४ मकनीय. ६५ सीळा निर नैव्येदये सेवि अनंदें. ६६ नीबधे. ६७ मालनीछेंद. ६८ 'व' समासांत आहे. ६९ शैल्ये.

सिमा सांगतां यत नाहीं शिळेची
मनोवृत्ति आनंदली अँर्जुनाची ॥५५॥
प्रतापी प्रभु चंद्रहास्या महीचा
बळी आगळा पुत्र पद्माक्ष त्याचा
दुजा पुत्र मयुरध्वज भूपतीचा
बळें आगळा वीर्यसिंधू बळाचा ॥५६॥
वसंततिलका :– आले बळें बळनिधी बळसागरातें
नेला तुरंग भुवना भुप चंद्र जेथें
पत्रीं पदार्थ सुचला हरिभक्तिरंगें
भेटेल कृष्ण किरटी मज या प्रसंगें ॥५७॥
बोले सुताप्रति प्रभू विरकेसरी तो
रक्षा तुरंगम बळें हरिलाभ होतो
नाहीं प्रयोजन कदा शुभ घोडियाचें
देखेन कृष्ण किरटी मज आर्त त्यांचें ॥५८॥
भुजंगप्रयात :– दळेसीं बळें चंद्रहास्या निघाला
कटेसीं हरीनीकटीं शीघ्र आला
लिला लोचनीं देखिलें माधवाला
मनीं सूमनीं फार संतोष जाला ॥५९॥
रथारूढ देखे जगत्तांततात
पळाली दिंगंतीं भरे सर्व चिंता
म्हणे अंतरीं या रणीं जुंझ घेतां
हरी देखतां पार्थ जितीन आतां ॥६०॥
दळें तुंबले वीर वेगी निघाले
कटे नीकटीं कीरटी कृष्ण आले
प्रभू भीम भावार्थ भावें विलासे
तनू भक्ति सामुद्रिकें रंगलीसे ॥६१॥

---

७० अजुनाची. ७१ जगतातत्राता. ७२ दिगांती.

रथीं देखिला श्रीपती चंद्रहास्यें
त्वरें धांवला भीम संतोष तोषें
शिरांबूज ठेवी पदांबूज देशीं
अली लुब्ध पद्मांतरीं प्रीति तैसी ॥६२॥

तोटक:- करुणानिधि देवदया सदेयी[७३]।
उचलोनि दयाळ धरीं हृदेयीं[७४]
भरले नयनांबुज प्रेमजळें।
गळती घन तेविं मनें विकळें ॥६३॥

वृंत्त[७५] :- हरि म्हणे किरटी विरकेसरी
चंद्रहास्य सुखसागर अंतरीं
क्षेम आलिंगन दे सखयापरी
न धरि अन्य अहंकरुत सावरी ॥६४॥

भुजंगप्रयात :- म्हणे वीर अर्जून देवें दयाळें[७६]
मला बोधिलें भीष्मपर्वी[७७] करुपाळें
विरें[७८] सांडितां युद्धधर्मासी[७९] देहीं
पडे वीर तो नर्कसिंधुप्रवाहीं ॥६५॥

प्रमाणिका :-तुखार मागिलीं[८०] सळें। सवें सेनादळीं दळें
विरश्रिया महाबळें। बळें बळाढ्य तुंबलें ॥६६॥
तयासि भेटतां रणीं। अपार निंद्य या जनीं
करा विवेक चाळनी। कितेक हसती मनीं ॥६७॥
हरी म्हणे विरोत्तमा[८१]। विरोत्तमांत उत्तमा
पवित्र भूपती पहा। भुपाळ चंद्रहास्य हा ॥६८॥
अपार पुण्यवंत हा। स्वयं सगूण संत हा
महामती महंत हा। भुपांमधें श्रीमंत हा ॥६९॥

---

७३ सदई. ७४ हृदई. ७५ वसंततिलकाछेंद. मिश्र आहे. द्रुतविलंबित आणि पृथिका यांचें मिश्रण. ७६ यादलें. ७७ भीस्म. ७८ विरं. ७९ युध्ये. ८० माघिला. ८१ विरोतमा.

शरासनी शिरोमणी। अजिंक्य[82] हा रणांगणीं
अहंकृती विचारणा। त्यैजून[83] भेट अर्जुना ॥७०॥

भुजंगप्रयात :– प्रभू माजिया भीम भक्तासि भावें
करी वंदना वंदिजे त्यासि देवें
हरीभक्त आलिंगितां प्रेम दाटे
भवाब्धीभरें तुंबला तुंब आटे ॥७१॥

पुढें पार्थ सद्भाव भावें विराला
महाराज आलिंगनाला निघाला
किती लोटला स्वेद रोमांच देहीं
किती लोचनीं नीर दोघे विदेही ॥७२॥

पुढें आणिले पुत्र दोघे सभेतें
हरी वंदिला भेटले अर्जुनातें
म्हणे चंद्रहास्या हरी मेघनीळा
चला भूवना भूपती लोकपाळा ॥७३॥

त्वरें भूपती आणिले भूवनाला
बरें शीघ्र अभ्यंग[84] जालें तयाला
अळंकार खचीत रत्नें भुपाळा
किती अंबरें पाचि पेरोज माळा ॥७४॥

बरीं भोजनें भव्य जालीं भुपाचीं
दळें जेविलीं सर्वही भूपतीचीं
करी प्रार्थना चंद्रहास्या नृपाची
मनें[85] तृप्त[86] जालीं सभानायकाचीं ॥७५॥

वदे चंद्रहास्याप्रती मेघनीळा
भुमी जिंतिली सर्व आम्ही भुपाळा

---

८२ अजीक. ८३ त्येजुन ८४ अभेंग. ८५ मन. ८६ त्रुप्ती.

बळें जिंतिले जे बळें तुंबळेसी
सर्वे भूपती भीम नाना विलासी ॥७६॥

प्रभूजी जितीले सर्वे भूपथाटी
सुखें संनिधें चालती वीर जेठी
पुढें पावलें कौंतळापूर पाठीं
विराजीत जाली तुझी शीघ्र भेटी ॥७७॥

प्रमाणिका:-असे तुम्हासि वीनती। तुरंग दे महीपती
वदे महींद्र सूमती। तुखार आणिला सुतीं ॥७८॥

वसंततिलका:- बोले सुतांप्रति सखा सुखदायकातें
द्यावा तुरंगम तुम्ही यदुनायकातें
ते बोलिले विरनिधी, विर भारतींचा
आला बळें सबळ तुंबळ संपतीचा ॥७९॥

आला असे विर विराजित राजभारें
पाहों प्रभू रणभुमी शरधारमारें
कैसा फिरे रथ रणीं रणसिंधुपारें
युद्धांविना दिसति ना सहसा तुखारें ॥८०॥

भुजंगप्रयात :- वदे श्रीहरी देव द्वारावतीचा
तुम्हां तात, बंधू सखा अर्जूनाचा
असे मी हरी देव दोघा-जणांचा
तुम्हांमाजि हा वादवेवाद कैंचा ॥८१॥

वदे चंद्रहास्य सुतांलागि पाहे
हरीवीण आम्हां सखा कोण आहे
विराजीत हा भारतीवीर-सिंधू
सखा संनिध आमुचा होय बंधू ॥८२॥

---

८७ युध्या. ८८ भारथी.

पुढें आणिला कर्ण कानें सभेसी
प्रितीनें प्रभू भेटले अर्जुनासी
करीं दीधला वंदिलें माधवासी
सदानंद आनंद जाला जनासी ॥८३॥

मनोरम्य रंजे कथा भारतीची
महा ज्ञान वैराग्य[८९]-गंगा गुणाची
जयमाजि हे कीर्ति दामोदराची[६०]
वदे भारती रामसुतात्मजाची ॥८४॥

कथा ऐकतां सर्व ही दोष[९०] जाती
अघें नासतीं सर्व जाती दिगंतीं[७२]
असें न्यून[९१] तें पूर्ण[९२] संतीं करावें
पद-प्रास[९३]-अर्थीं बरें वीवरावें ॥८५॥

कथा भारतीची मनोरम्य वाणी
असे भक्तिभावार्थ आनंदखाणी
जनें चिंतिला देव सारंगपाणी
असे तो कवि विश्वनाथाभिमानी ॥८६॥

प्रसंग दहावा श्रीकृष्णार्पणमस्तु रामार्पणमस्तु

सके १६६४ दुंदुभीनाम संवत्सरे मार्गसीर्ष मासे सुक्ल पक्षे
चतुर्थ्यायां ४ अद्यवासरा मंदवासरे ततदिनी
पुस्तक समाप्ताः

हस्ताक्षर शीवानंदचरणीं दृढ विस्वास शंकरसुत शीवदास

——

८९ वैराग्ये ९० देश. ९१ नुन्य. ९२ पुर्न ९३ प्राश.

# चंद्रहास्यकथा

## प्रसंग पहिला

**कथासूत्र :–**

धर्मराजानें राजसूय यज्ञ केला. सुंदर आभूषणांनीं सजविलेला यज्ञीय अश्व निरनिराळ्या प्रदेशांतून संचार करीत होता. अनेक वीर त्याचें संरक्षण करण्यासाठीं त्याच्या बरोबर होते. पांडवांचें सामर्थ्य जगद्विख्यात असल्यामुळें त्या घोड्यास अडविण्याचें धाडस कोणीच करणार नाहीं, असा विश्वास, अश्वाबरोबर असलेल्या सर्वच वीरांस वाटत होता. तथापि, कुंतलपुरासमीप आल्यानंतर मात्र तो अश्व दिसेनासा झाला. यज्ञीय अश्व अडविणें म्हणजे पांडवांच्या सामर्थ्यास एक मोठें आव्हानच होतें. अशा प्रकारचें आव्हान देणारा प्रबल राजा कोण असावा याविषयीं सैन्यांत तर्कवितर्क चालू झाले. अर्जुनहि चिंताक्रांत झाला. इतक्यांत नारदमुनि त्या ठिकाणीं आले. त्यांनीं अर्जुनाच्या मनांतील चिंता ओळखून यज्ञीय अश्व, महापराक्रमी अशा चंद्रहास्य राजानें नेल्याचें सांगितलें.

याच संदर्भात नारदमुनींनीं चंद्रहास्याची जन्मकथा सांगितली आहे. चंद्रहास्य हा केरळाधिपति सुधार्मिक राजाचा मुलगा. तो तीन वर्षांचा असतांना राजावर संकट ओढवलें. अनेक राजांनीं चंद्रहास्याच्या पित्यास वेढलें. या युद्धांत राजा मारला गेला. चंद्रहास्याची आई स्वपतीबरोबर सती गेली. दाईनें चंद्रहास्याचा सांभाळ केला. परंतु ती दाईसुद्धां अधिक काळ जगली नाहीं. भटकत भटकत ती कुंतलपुरास आली. तेथें आंबतींभोंवतींच्या स्त्रियांस हा राजपुत्र असल्याचें सांगून त्याचप्रमाणें या मुलाचा प्रेमानें सांभाळ करावा, असें विनवून तिनें प्राण सोडला. चंद्रहास्य दु:खी झाला. जमलेल्या स्त्रियांनीं

त्याचें सांत्वन केलें. जन्ममृत्यु अपरिहार्य व अटळ असल्यामुळें त्याचा शोक करण्यांत अर्थ नाहीं, अशी या स्त्रियांनीं त्याची समजूत घातली.

श्लोक १– पहिल्या चरणांतील दयाळ या शद्वाचा, दुसऱ्या चरणांतील उदधि या शद्वाशीं समास करून दयाळउदधि असा सामासिक शद्व करावा. त्याचप्रमाणें चौथ्या चरणांत स्वज्ञानप्रकाशउदयो असा सामासिक शद्व बनवावा म्हणजे अर्थ स्पष्ट होईल. या श्लोकांत प्रेमाचा आणि दयेचा सागर असलेल्या मारुतीस वंदन करण्यांत आलें आहे. सूर्यामुळें प्रकाशाचा उदय होतो, त्याचप्रमाणें मारुती हा ज्ञानोदयकारक असल्याचें वर्णन कवीनें केलें आहे.

श्लोक २– "जनांस मनोवेधक वाटेल अशी रचना कर" अशी गणपतीची पार्थना, या श्लोकांत कवीनें केली आहे.

श्लोक ३– या श्लोकांत जगदंबेस वंदन करण्यांत आलें असून तिला सृष्टीचें आदिबीज मानलें आहे. "हे जगतारके मला सद्‌गति दे, सन्मति दे. हे जगदंबे तूं स्वयंभू आहेस. तूं मला सहज तुझे गुण गाणार असा कवि कर."

श्लोक ४– यांत शारदावंदन आहे. विवर = विशेष वर. 'सार दे' एक शद्व करावा. अर्थ शारदे. भवसागरपारदे = संसारसागराच्या पार नेणारे, वचनदे = हे वाग्देवी, मला सुंदर रचना करण्यास बुद्धि, ज्ञान दे.

श्लोक ५– यांत सद्‌गुरूचें वर्णन आहे.

श्लोक ६– यांत सज्जनांस वंदन करून रामसुतात्मज कवि भारतांतील कथा सांगेन म्हणतो.

श्लोक ७– मही = पृथ्वीवर. प्रत्ययरहित रूप. इळापाळ = पृथ्वीपालक. राजा.

श्लोक ८– मन्याळी = घोड्याच्या गळ्यांत घालावयाच्या कांचेच्या मण्यांच्य माळा. किंकिणीक्वान = लहान घंटांचा मधुर आवाज. मोहळे = घोड्याच्या तोंडावर शोभेसाठीं घालतात ती मोहोरकी.

ज्वाळमाली = अग्नि. येथें तेजस्वी पट्ट्यांचीं जाळी, माळा. चवथा चरण = खंजपिच्छी = खंजपक्षाच्या शेपटीसारखा तुरा आकाशांत (घोड्याच्या डोक्यावर) चमकत होता. निराळ = आकाश.

श्लोक ९– झम झाल्लरि झूलि = तेजस्वी झूल; घागरवेळरव = मोठ्या घुंगरांचा आवाज. रशना–रसना–रचना = घोड्याची लगाम. हाटक तंतु = सोन्याचा तंतु, सोन्याच्या काड्या.

श्लोक १०– त्या घेड्याच्या कपाळावर रत्नजडित सोन्याचें पान शोभत होतें. सोन्याच्या सुताचें वस्त्र त्यावर आच्छादलें होतें आणि रत्नजडित सोन्याचें पल्याण त्याच्या पाठीवर शोभत होतें, हा भावार्थ. पाखर = घोड्याच्या पाठीवरील शोभेचें अथवा संरक्षणाचें वस्त्र. 'स्यादश्वकवचं पाखर्' (राजव्यवहारकोश). प्रक्षर = पाखर – पाखर. आजहि – खोगीर लावल्यानंतर टाकलेल्या वस्त्रास पाखर म्हणतात.

श्लोक ११– पाची पेरोज = रत्नविशेष. जडित्कोंदणीं = कोंदणांत जडविलेलें. या दोन्ही शद्वांचा कवीनें संधि केला आहे. हें चिंत्य रूप.

श्लोक १२– चंद्रकलेसारखा अचल म्हणजे अत्यंत चंचल, हत्यारबंद कवचाच्या योगानें बलाढ्य, जणूं सुगंधांत घोळलेला वसंतऋतु असा घवघवीत आणि सर्वांगाचा सुगंध येणारा यज्ञीय अश्व चालला, हा भाव. सीळ–सिले–सिळ = हत्यारबंद कवच.

श्लोक १३– दिव्यसार = तेजस्वी, त्याचा वर्ण शुभ्र तेजस्वी नि कर्ण काळे (म्हणूनच शामकर्ण नांव)

श्लोक १४– सम हें शद्वयोगी नामाच्या 'चंद्रिका'च्या मागें लावलें. हा प्रकार लक्षांत ठेवणें. भार = समूह. कट = सैन्य.

श्लोक १५ – किंकाटे = चित्कार करीत. भीम = भयंकर.
घोड्याच्या संरक्षणासाठीं आलेल्या सेनेंतील रथांच्या चाकांनी मोठमोठ्या पर्वतांचें चूर्ण होत होतें, हा भावार्थ.

श्लोक १७ – चामरें चवऱ्या. सूर्यपत्रें = आभ्रकाच्या छत्र्या, अब्दागिऱ्या.

श्लोक १८ – दमामें = रणभेरी. या श्लोकांतील बरेच शब्द वाद्यांचे ध्वन्यर्थ-सूचक आहेत. दमामे, ढोल, दुंदुभि, नगारे, शंख, भेरी, तुतारे, दुटाळे यांच्या आवाजानें पृथ्वी दणाणली.

श्लोक १९ – शेंकडों वीर स्वतःच्या बिरुदावलींचा घोष करीत, गर्जना करीत युद्धास सज्ज झाले हा भाव.

श्लोक २० – चेइरे = चेव आलेले, चवताळलेले. पटीश = शस्त्रविशेष; खेटके = ढाल; खर्ग = खड्ग.

श्लोक २१ – सैन्यांत असलेल्या बऱ्याच राजांच्या नांवांचा उल्लेख या श्लोकांत आला आहे. 'जैमिनी अश्वमेध' पहा.

श्लोक २३ – जलचर, विद्याधर, किन्नर, अप्सरा, असुर, देव, राक्षस खेचर यांनीं अश्व नेला असेल काय, हा भावार्थ. सरुवरीं=सरो-वरांत; आसरीं = जलदेवतांनीं, अप्सरांनीं.

श्लोक २४ – अतळ, सुतळ, रसातळ, सप्तपाळांपैकीं तीन.
फणींमंडळीं = नागलोकांत; दिशांतरबिळ = दिशांची पोकळी.

श्लोक २९ – हाटकांगी = सुवर्णांगी.

श्लोक ३१ – धारा मतीचा = बुद्धीचा आश्रय, बुद्धिमान.

श्लोक ३२ – निळोत्पळ = कमळ; नीळनिळोत्पळ = नीळकमळ.
चरण दुसरा – निर्मळ नीळकमळासारखें नेत्र असलेली.
चरण चवथा "पतीला सुंदर वाटणारी, मनाला मोहविणारी" असा भावार्थ.

श्लोक ३३ – प्रवाळाधरा = प्रवालासारखा अधर असलेली.

श्लोक ३५ – निजभाज = आपली भार्या. सळें = ईर्ष्येनें.

श्लोक ३७ – सिसाळें = शीर्षावलि.

श्लोक ४१ – शरीं विचंवला = बाणांनीं त्याचें शरीर चिबून, पिचून गेलें.

श्लोक ४२ – विसंचला = सुटला.

श्लोक ४३ – किलःब्धि = केरळाधिपति सुधार्मिक राजा.

श्लोक ४६ – पहिल्या चरणाचा दुसरा पाठ असा आहे– “ सांभाळि तीन वरुष करितांचि दाया”. याचा अर्थ त्याच्या दाईनें तीन वर्षे त्याचा सांभाळ केला, असा होतो. यास्तव हाच पाठ घेणें बरें.

श्लोक ४७ – या श्लोकापासून ६१ व्या श्लोकापर्यंत चंद्रहास्याची दाई आपला मरणकाळ जवळ ओढवला आहे असें पाहून सख्यांना बोलावून चंद्रहास्याचें पालन करण्याविषयीं विनंति करते.

श्लोक ४८ – प्रदेसो = परदेशी, पोरकें; प्रदेसोवर अनुस्वार नको.

श्लोक ५४ – तिसरा, चवथा चरण – “माझा जीव ह्याच्या मायेंत गुंतला पण काय करूं ह्याचें दैव थिटें पडलें आहे.” असा भावार्थ घ्यावा.

श्लोक ५७ – चंद्रहास्यास पोटाशीं धरून तिनें फार विलाप केला. तेव्हां दु:खसागरावर लहरीवर लहरी उठत होत्या. तिला मोठा मोह उत्पन्न झाला. भीप भ्रांति=महा मोह. भरो भरी=दाटून, भरून.

श्लोक ६४ – आम्ही तुझ्या बाळाची आबाळ करणार नाहींत. त्यास भाग्य मिळेल असें करूं. हा राजपुत्र आहे, असें निश्चित वाटतें. पुर + तें = एक शद्ब करावा. पुरतें = पूर्ण, निश्चित सरतें = पुढें सरणारें.

श्लोक ६५ – वोसावली = ओस पडली, फिकी झाली, निस्तेज पडली.
चरण २ रा– मरतांना जशी मति. असते तशीच गति मिळते, यास्तव तूं आतां रामाचें स्मरण कर, असें तिच्या मैत्रिणी म्हणतात.

चरण ३ रा– 'दे या' याचें पाठांतर 'दाया' आहे. तेव्हां दुसरा पाठच घ्यावा.

श्लोक ६७ – रति = अल्प.

श्लोक ६९ – चरण ४ था 'नते' ह्या जागीं दुसऱ्या पोथींत 'रती' असा पाठ आहे तो योग्य.

श्लोक ७० ते ७५:– चंद्रहास्याचे उद्‌गार आहेत.

श्लोक ७१– सरिसी = लौकर. कठिणांत्तर = ( कठिण + अंतर )

श्लोक ७२– कोण वनीं = कोणत्या वनीं. जातसि = जातीस, जातेस.

श्लोक ७३– दुसऱ्या पोथींत चवथा चरण " समुळ प्रेमलता मुळि तूटली " असा आहे. एकाच चरणाची पुनरुक्ति टाळण्यासाठीं हा पाठ घ्यावा.

श्लोक ७४– दुसऱ्या पोथींतील तिसरा चरण असा " जिवसया तुझिया सखि साजणी " चंद्रहास्याचे हे उद्‌गार बाईला उद्देशून आहेत. यास्तव हा पाठ घ्यावा. अर्थ–मला तुजविण कुणी सखा नाहीं. तुझ्या जिवावरच मी वाईट काळ कंठिला. ह्या ज्या तुझ्या जिवलग मैत्रिणी आहेत त्यांच्या स्वाधीन तूं मला कर.

श्लोक ७६– पुरस्त्रिया चंद्रहास्याचें समाधान करतात. संबोखिती = संबोधतात.

श्लोक ७७– मृगजळासम तुल्य. सम आणि तुल्य एकाच अर्थी दोन शद्बांचा उपयोग.

श्लोक ७८–८२–या श्लोकांत "जातस्यहि ध्रुवो,मृत्युः, ध्रवं जन्ममृतस्यच । तस्मादपरिहार्येर्थे नत्वं शोचितुमर्हसि" हा गीतोक्त सिद्धान्त सांगितला आहे. जन्माला आलेला प्राणी मृत्यु पावणार आणि मृत हा पुन्हां जन्माला येणार हें निश्चित. हें अपरिहार्य असल्यामुळें जन्ममृत्यूचा शोक करणें निरर्थक आहे, हा भाव.

श्लोक ७८–लागुनी = चिकटलेला.

---०---

# प्रसंग दुसरा

**कथासूत्र:**– बाईच्या मरणानंतर चंद्रहास्य अत्यंत उद्विग्न झाला. त्याचें खाण्यापिण्यांत, खेळण्यांत कशांतच लक्ष लागेना. एखादा विरागी योगी ज्या उदासीन वृत्तीनें जगांत वावरतो त्याप्रमाणें तो वागूं लागला. नगरीच्या स्त्रियांनीं अत्यंत प्रेमानें त्याचें लालपालन न केलें. उदासीन अवस्थेंत तो वावरत असतांना एक सुंदर शालिग्राम शिला त्यास सांपडली. तो ती नित्य आपल्या मुखांत वागवीत असे. भोजनापूर्वी नवविधाभक्तिपूर्वक तिची पूजा करण्यास तो चुकत नसे.

कुंतलनगरीचा राजा सुबुद्धि नामें होता. त्याच्या प्रधानाचें नांव दुष्टबुद्धि होतें. एकदा त्याच्या घरीं मोठा उत्सव झाला. या उत्सवांत पुष्कळ ऋषिमुनि देखील आले होते. रस्त्यांत खेळणाऱ्या मुलांत अत्यंत उठून दिसणारा राजबिंडा चंद्रहास्य पाहून दुष्टबुद्धि मंत्र्यानें त्यास त्या समारंभास नेलें. जमलेल्या लोकांवर त्याच्या सौंदर्याचा प्रभाव पडला. बालक गुणवान् आहे. असें जो तो म्हणूं लागला, भोजनाच्या वेळीं त्यानें आपल्या मुखांतील शिलेचें पूजन केलें. भोजनोत्तर मंत्राक्षता टाकतांना ऋषींनी चंद्रहास्य प्रधानपुत्रच आहे असें समजून त्याच्या डोक्यावर आक्षता टाकल्या. तेंव्हां हा मुलगा राजा होणार म्हणून दुष्टबुद्धीस चिंता लागली. त्या मूलाचा कांटा काढण्याचें त्यानें ठरविलें. दोन मारेकऱ्यांवर ही कामगिरी सोंपविली. मारेकऱ्यांनीं चंद्रहास्यास घोर अरण्यांत नेलें. तेथें आपली अंतिम घटिका आली हें जाणुन चंद्रहास्यानें परमेश्वराचा धांवा आरंभिला. मारेकऱ्यांचें हृदयपरिवर्तन झालें. त्याला जीवदान देऊन पण त्याच्या पायाचें सहावें बोट कांपून घेऊन मारेकरी दुष्टबुद्धि प्रधानाकडे गेले. दुष्टबुद्धीनें त्यांस पुष्कळ द्रव्य दिलें. इकडे घोर अरण्यांत हा बालक शोक करीत सारखा फिरत असतांना कुळींद्र भूप त्या वनांत मृगयेसाठीं आला. तो त्यास आपल्या नगरास घेऊन गेला.

श्लोक १ – 'तेयाची', पाठभेद 'तयेची' योग्य.

श्लोक २ – वैराग्यशील पुरुष निरासक्त वृत्तीनें जगांत वावरतो त्याचप्रमाणें दाईच्या वियोगानें–दुःखी झालेला चंद्रहास्य वर्तूं लागला, हा भावार्थ. संगी सयोगी = सवंगड्यांत. मनस्वी = मननशील.

श्लोक ३ – विदेही = देहाची जाणीव नसलेला. अभ्यंगिती (नाम धातु) = अभ्यंगस्नान घालतात.

श्लोक ४ – चरण २ रा. उभी ठाकली रम्यरेखा विधीची = दैव उदयास आलें.

श्लोक ५ – चरण २ रा. 'बाळ' 'खेळ' हा पाठ सरस.
चरण ४ था. 'नवांकीत चक्र प्रभू दीव्यकांती' हा दुसऱ्या पोथींतील पाठ सरस.

श्लोक ६ – तिसरा चरण. 'अभ्यंगिती शशिकला सकळा तयातें' हा दुसऱ्या पोथींतील पाठ योग्य. ह्यानें वृत्तभंगाचा परिहार होतो.
शशिहास्य = चंद्रहास्य. निजभोजनाते–यांत 'निज' शब्द निरर्थक वापरला आहे.

श्लोक ९ – प्रथम चरण–'चंदनांगी'च्या जागीं दुसरा पाठ 'चंदनालागि' हा योग्य. यानें वृत्तदोष नष्ट होतो.

श्लोक १० – प्रथम चरणाचा पाठभेद असा. 'प्रवाळाधरा सुंदरा लोकजाया हा योग्य.

श्लोक १३ – इंदिराब्धी = वैभवाचा सागर.

श्लोक १७ – उडुगण = तारागण.

श्लोक १९ – मानसीं मनीं हे एकाच अर्थी. वापरले, रंजिला = आनंदित झाला. रंजला = दुःखानें गांजला. तो राजपुत्र पाहून सर्वांना आनंद झाला. बालक गुणवान् असूनहि दुःखानें गांजला आहे, असें त्या लोकांस वाटलें. किंवा कांहीं सज्जन म्हणूं लागले कीं, हा गुणाचा समुद्रच तसा शोभतो, असाहि अर्थ घेतां येईल. दुसरे पक्षीं रंजाला = शोभला असा अर्थ घ्यावा.

श्लोक २३ व २४ – चंद्रहास्य हाच राजपुत्र आहे असें समजून ऋषींनीं त्याच्या शिरावर अक्षता टाकल्या. प्रधान दुष्टबुद्धीस तें रुचलें नाहीं. 'भलत्या मुलावर तुम्ही अक्षता कां टाकतां' असें प्रधानानें विचारतांच ऋषिगणांनीं हा राजाच आहे, असें सांगितलें. ऋषींचें वाक्य म्हणजे मेरु पर्वत. तें कधीं ढळणार नाहीं, खोटें ठरणार नाहीं. म्हणून दुष्टबुद्धि प्रधानास चिंता वाटूं लागली. ब्रह्मरेखा = विधिलिखित.

श्लोक २८ – बिदीमाजी = रस्त्यामध्यें.

श्लोक २९ – वेन, कारिका, कांचन, धामन थाट = वृक्षविशेष. वाटिका = वाड्या, समुदाय.

श्लोक ३० – निर्मळ पाण्याच्या विहिरी, तळीं इ. असून तेथें अनेकविध पक्षी नि पशु आहेत. अशा या ठिकाणीं देवमंदिरें आहेत. त्यांत चतुर्भुज मूर्ति आहेत. आंत शलिग्राम आहेत आणि भोंवती देववृक्ष आहेत, हा भाव.

श्लोक ३२ – 'वोळी वोळी द्राक्ष दाळिंब वोळी' हा पाठ बरा.

श्लोक ३३ – बट = बटमोगरा.

श्लोक ३५ – चरण ४ था 'विशाळ व्याळ लोळणीं' हा पाठ योग्य.

श्लोक ३६ – त्या गिरिकंदरांत जेथें भयानक वृक्ष, मोठे डोंगर आहेत तेथ ते दूत बोलती, हा भाव.

श्लोक ३७ – निदानीं = संकटकाळीं.

श्लोक ३९ – पाणीवरी = हातावर. चरण ४ था – पाठ 'चित्तरंजे'

श्लोक ४२ – भूधराधरा = (भूधर–पर्वत, धरा = धारण करणारा) पर्वत धारण करणारा. धारक = धारण करणारा. गोचरपर = इंद्रियास आकलन होण्याच्या पलीकडे असलेला,

श्लोक ४३ – पूतनांतक = पुतनेचा अंत करणारा. अंतकांतक = काळाचाहि काळ असलेला किंवा काळाची भीति नाहींशी करणारा. अघबकांतक = अघासुर आणि बकासुर यांचा नाश करणारा

श्लोक ४४ – दनुजछेदका = दानवांचा उच्छेद करणाऱ्या.

श्लोक ४५ – चरण चवथा – मूळ पाठ 'कामनी' असा आहे. दुसऱ्या पोथींत 'कामिनी' आहे.

श्लोक ४६ – प्राणवांटनीं = प्राणाचा वियोग होतांना.
४३–४६ या श्लोकांत १, ३ आणि २, ४ अशा चरणांचे यमक आहे.

श्लोक ४८ – सन्नध = संनद्ध = सज्ज;

श्लोक ४९ – निज अरि = शत्रु. ('निज'हा शब्द निरर्थक)

श्लोक ५२ – पटांतरीं = वस्त्रांत

श्लोक ५४ – चरण ४ था—पाठांतर–'पडें भ्रांति संदेह तो नीवळेना' योग्य.

श्लोक ५६ – चामके = दचके. बोचके = बुजे.

श्लोक ६४ – तिसरा व चौथा चरण–शेवटचे शब्द 'हिंडतो,' 'चिंतितो' असे पाठ घेतले तर चंद्रहास्य हा कर्ता घेऊन अर्थ लावावा.

---

## प्रसंग तिसरा

**कथासूत्र** :– पुत्रसंतान नसलेल्या राजाला अरण्यांत सांपडलेला चंद्रहास्य हा परमेश्वरी प्रसाद वाटला. नगरींत आल्याबरोबर राजानें मोठा उत्सव केला. चंद्रहास्य आल्यापासून त्या राज्याचें स्वरूप पालटलें. धन्यधान्यादिकांची समृद्धी झाली. राजानें चंद्रहास्यास शिकविण्यासाठीं शिक्षक नियुक्त केला.परंतु चंद्रहास्य हरिचिंतनामध्येंच दंग राही राजाला थोडें वाईट वाटलें. परंतु त्यास उपाय नव्हता. पुढें चंद्रहास्याची त्यानें मौज केली. त्याला शस्त्रशास्त्र प्रवीण केलें. कांहीं काळानें पित्याची आज्ञा घेऊन चंद्रहास्य सभोंवतींचे प्रदेश जिंकण्यासाठीं निघाला. त्यानें पुष्कळ मोठा प्रदेश आणि अलोट संपत्ति जिंकलीं. ही संपत्ति घेऊन तो परत आल्यानंतर राजाला फार आनंद झाला. कौंतलाधीशास आपण पूर्वापार खंडणी देत आलीं आहोंत, त्या प्रमाणें या संपत्तीचा कांहीं भाग त्या राजास पाठवावा, असें आपलें मनोगत राजानें चंद्रहास्यास सांगितलें. चंद्रहास्यानें त्यास विरोध केला. "इतर राजांप्रमाणे

कुंतलपुरच्या राजासहि मी धरून आणतों." असें तो म्हणाला. स्वामीद्रोह करूं नये, असें राजाचें मत पडल्यामुळें चंद्रहास्यानें तो विचार रहीत केला. कांहीं मंत्र्यासह बरीच संपत्ति चंद्रहास्याच्या पित्यानें कुंतलाधीशाकडे पाठविली. ह्या मंत्र्यांचा राजानें गौरव केला. दुष्टबुद्धि प्रधान त्या मंत्र्यांना आपल्या घरीं भोजनास आमंत्रण देता झाला.

श्लोक २ – प्रेमळें = परिमळें हा शब्द असावा. सुवासानें; चोट एक कापड. काचबंदी = काचेप्रमाणें स्वच्छ दगडांनीं बांधून काढलेली.

श्लोक ४ – नाचणी = नर्तकी;

श्लोक ५ – चरण २ रा " उभारोनि पाणी क्रिया कुंकु लोटे"
चरण ३ रा "हटे भीम नेटे रिपूची सपाटे" असे पाठ आहेत. या श्लोकचा अर्थ समाधानकारक लागत नाहीं. पण मुळापेक्षां हे पाठभेद बरे वाटतात.

श्लोक ६ – राणीनें त्या बाळास ओवाळिलें. मंडनाकार = शोभविणारी आकृति असा झाला.

श्लोक ८ – चरण ३ रा ऋषींच्या आशीर्वादाच्या स्वरूपाचा आहे. ' तूं पृथ्वीवरचे सर्व राज जिंकशील;' हा भाव.

श्लोक १० – "जन" शब्द नपुंसकलिंगी, चिंत्य.

श्लोक ११ – १३ –यांत चंद्रहास्याच्या आगमनानें राज्याची स्थिति कशी झाली तें वर्णिलें.

श्लोक ११ – पाऊस योग्य प्रमाणांत पडूं लागला, भूमि अपार पिकूं लागली, वृक्षलता फुलांफळांनीं बहरूं लागल्या.

श्लोक १२ – स्त्रियांना वार्धक्य येईना. त्या सदा तरुण, सुंदर दिसूं लागल्या वांझ गाई दुभत्या झाल्या. नगरांत धर्मशाळांतून पुराणें कथा कीर्तनें इ. होऊं लागलीं. होमशाळांतून वेदध्वनि येऊं लागला.

श्लोक १३ – लोक निरोगी होऊन आनंदी झाले. दाही दिशा निर्मळ झाल्या. कुळीन्द्राच्या कुळांतून दुःख, दारिद्र्य दूर गेलें.

श्लोक १५ – शेवटच्या दोन चरणांचा अर्थ– चंद्रहास्यानें तीं सर्वं अक्षरें मनांत वाचिलीं. त्यांतील दोनच मला आवडतात असें तो म्हणाला.

श्लोक १६ ते २१ – चंद्रहास्याला सर्व विद्यांपेक्षां हरि हा श्रेष्ठ वाटला. 'सर्वं विष्णुमयं जगत्' सर्व जगत् हें विराट् पुरुष हरीचें स्वरूप आहे असें त्यास वाट. हा त्याचा भाव या श्लोकांत कवीनें वर्णिला आहे.

श्लोक २२ – चरण तिसरा. येथें 'सुधा' हा दुसरा पाठ आहे.

श्लोक २७ – केदारीं = बदरिकेदारीं सित = शीत = थंडी. बदरिकेदारीं शीतसाधना केली, थंडींत तप केलें हा भावार्थ.

श्लोक ३२ – वर्त = व्रत;

श्लोक ३४ – मांदुसें = पेटया

श्लोक ३५ – विग्रह = भेद, दुजाभाव, वैर

श्लोक ४१ – चरण १ ला 'कधीं मी' चरण २ रा "कधीं भेटि होईल त्या..." चरण ४ था 'कई' असे अनुक्रमें पाठ दुसऱ्या पोथींत आहेत. ते घ्यावेत.

श्लोक ४७ – इळा = पृथ्वी चरण ४ था त्यांचीं सैन्यें म्हणजे मोठे महासागरच होत.

श्लोक ४८ – किलाब्धी अथवा किलाद्री = किलाधीश. हा चंद्रहास्याचा जन्मदाता बाप.

श्लोक ५२ – चरण ४ था 'बळेसी'. दुसरा पाठ 'दळेसी'. दोन्हींचा अर्थ एकच.

श्लोक ५५ ५६– या श्लोकांत वाद्यांचे आणि वाद्यध्वनिसूचक शब्द बरेच आले आहेत.

श्लोक ५९ – राजांचीं बेटें, भुईकोट किल्ले, दुर्ग आणि पाटणें अशीं अनेक जिंकलीं.

श्लोक ६० – रुद्रघार = भयंकर घाव.

श्लोक ६१ – गोमेध = रत्नविशेष. खोटी = लगड, – धातूचे गोळे. फेरोज– पेरोज = रत्नविशेष.

श्लोक ६४ व ६५ – यांत चंद्रहास्य स्वपित्यास सांगतो कीं मी हे अनेक राजे जिंकून आणले.यास्तव हे तात, यांस आपण भेट द्या. तदनुसार राजा त्या सर्व राजांना भेटतो.

श्लोक ६६ – राजानें त्यांचा गौरव केला. ते राजे चंद्रहास्यास म्हणाले आम्हांस आतां काय आज्ञा आहे ? आम्ही आपल्या मुलां-बाळांस येथें आणावें काय ?

श्लोक ७० – नामार्थिला = नांवाजलेला. तां = त्वां हें रूप चिंत्य आहे.

श्लोक ७३ – तुखारें—शुतर—तुषार—तुखार = उंट असा अर्थ वाटतो; पण पुढें हा शब्द अश्व या अर्थी कवीनें वापरला आहे. दिव्यसार = तेजस्वी. दमामा = वाद्यविशेष.

श्लोक ७४ – निशाणें = वाद्यविशेष. छत्रमाही = मत्स्य इ. सन्मानदर्शक चिन्ह असलेलें छत्र. कस्तुरीचीं बिडाळें = जवादि मांजरें यांच्या अंडकोषांत कस्तुरी सारखा सुगंधी मळ असतो.

श्लोक ७५ – तुणी = भाते.

श्लोक ७९ – शशिहास्य = चंद्रहास्य ( नांवाचें भाषांतर. )

---

## प्रसंग चवथा

**कथासूत्र** :– दुष्टबुद्धि प्रधानानें मंत्र्यांना मेजवानी दिली. त्या दिवशीं एकादशी असल्यामुळें चंद्रहास्याच्या मंत्र्यांनीं अन्नग्रहण केलें नाहीं. इतकेंच नव्हे तर चंद्रहास्याच्या आज्ञेवरून आपल्या राज्यांत सारे हरिदिनी करतात असेंहि त्या मंत्र्यांनीं सांगितलें. प्रसंगानुरोधानें चंद्रहास्याची बरीच स्तुति या मंत्र्यांनीं केली. दुष्टबुद्धि हा नांवाप्रमाणें दुष्ट वृत्तीचा होता.त्याला चंद्रहास्याचा उत्कर्ष सहन झाला नाहीं. तो मंत्र्यांस म्हणाला तुम्ही निश्चित

रहा, मी चंद्रहास्यास आणि त्याच्या पित्यास बांधून आणीन. तो लगेच कळींद्र नगरांस आला.त्यानें राजास आपला पुत्र (चंद्रहास्य) दाखविण्याची विनंती केली. त्यास पाहुनांच त्यानें तो आपला पूर्वीचा वैरी हें ओळखलें. मोरकऱ्यांनीं त्यास न वधितां केवळ एक बोट कापूनच जिवंत सोडलें हें त्याच्या लक्षांत आलें म्हणून त्यानें दुसरा डाव रचला.चंद्रहास्याचा गौरव करून त्यानें त्यास एक कार्य सांगितलें तें म्हणजे अगदीं एकांतांत दुष्ट बुद्धीनें आपल्या पुत्रास लिहिलेलें पत्र त्याच्या पुत्रास नेऊन देणें. त्या पत्रांत दुष्टबुद्धीनें लिहिलें, "विष यासि दीजे". पण घडलें मात्र निराळेंच !

श्लोक ३ – पादरक्षा = पादत्राण,

श्लोक ७ – निग्रह् = बंधन. ह्या कवि कूटात्मक रचना करतो. तेव्हां या श्लोकाचा अर्थ पुढीलप्रमाणें लावावा. सेवक म्हणतात, भोजनास आम्हांस आग्रह करूं नका. दुष्टबुद्धि म्हणतो, ह्या लोकांत मोठा दुराग्रह आहे. ह्यांना मोठेंच भय (चंद्रहासाचें) दिसतें. त्यावर कवि म्हणतो, पुढें (तुझ्या = दुष्टबुद्धीच्या योगानें) सज्जनांना (चंद्रहास्यपित्यास) बंधन प्राप्त होईल. पण शेवटीं तुझ्यासारख्या दुर्जनाच्या गृहांतच कलह माजेल (मदन तुज विरुद्ध वागेल). येथें "गृह, आग्रह, निग्रह, विग्रह" या शद्बांवर कवि कोल्हाट उड्या घेत आहे. त्यामुळें ही अर्थाची ओढाताण झाली. चवथा चरण:– ग्रहीं–गृहीं = घरांत ग्रहो = कलह ग्रहीं ग्रहो = गृहकलह माजेल हा भावार्थ !

श्लोक ८ – 'शशीहास्य चित्तीं' अशीं पदें शेवटच्या चरणांत घ्यावीत 'बोलताहे' असा एक शब्द करावा.

श्लोक ९ – हे दुष्टबुद्धी प्रधानाचे उद्‌गार आहेत.

श्लोक १० – यमक; अर्थाची ओढाताण.

श्लोक १५ – चरण ४ था, अकरा दिवसांत सर्व पृथ्वीस तो कड्याप्रमाणें शोभता झाला, आर्थात समुद्रवलयांकित पृथ्वी त्यानें आपल्या अंकित करून घेतली, हा भाव.

श्लोक १७ – आजींक = अजिंक्य

श्लोक १८ – नामसीमा = फार नांवाजलेला. हे उद्गार कौंतळपू च्या राजाचे आहेत.

श्लोक १९ – राजास नमस्कार करून दुष्टबुद्धि घरीं आला.

श्लोक २० – निजनाम = निज शब्द निरर्थक; ही तत्कालीन छाया आहे. कमळा = लक्ष्मी.

श्लोक २१ – घरीं वृक्ष लावले पण उद्यापन न केलें तर त्यांचें जिणें व्यर्थ आहे. यास्तव त्यांच्या उद्यापनाचा विचार करा. ह्या बोलण्यानें विषया चतुरपणें आपल्या विवाहाची सूचना आपल्या पित्यास देते.

श्लोक २२ – खंजनेत्री = खंज पक्षाच्या नेत्रांसारखे आहेत. नेत्र जिचे अशी. चोज = कौतुक. सज्ञान होणें = तारुण्यांत येणें.

श्लोक २३ – कंठनीळ = महादेव. कवीनें वृत्तसुखार्थ 'नीळकंठ' या शब्दाचें असें रूप केलें. कवि शब्दांशीं असे पुष्कळ खेळ करतो. रुंड = मुंडके, शिर. व्याळपाळा = सर्पांचा पाळा, समुदाय.

श्लोक २४ – भिकारी शब्द येथें वामनावताराचा निदर्शक आहे.

श्लोक २५ – चरण तिसरा यम सदा लोकांच्या आयुष्यांस सुरुंग लावण्यांत गुंतला असतो. रामा = स्त्रीं

श्लोक २६ – मघवा = इंद्र. योग्य, समान एकाच अर्थी दोन शब्द.

श्लोक २७ – मयंक = चंद्र

श्लोक २८ – विरंगले = हिच्यापुढे ते रंगरूपहीन दिसूं लागले, फिके पडलें.

श्लोक २३ ते २८ – शंकर, विष्णु, ब्रह्मदेव, इंद्र, सूर्य यांच्यांत सुद्धां दोष असल्यामुळें विषयेस ते अनुरूप वर नाहींत हा भाव.

श्लोक २९ – चरण ४ था दुसऱ्या पोथींत पुढील प्रमाणें पाठ आहे. " करूं लग्न ईचें बरे लागवेगी "

श्लोक ३० – फारच संदिग्ध रचना.

श्लोक ३२ – लोटे – अपपाठ, लोठे-लोटे = दांडगे.

श्लोक ३३ – नृत्यति – नामधातु ( नाचतात ). चंद्रावती चंद्राहास्याच्या नगरीचें नांव.

श्लोक ३५ – यांतील पहिला चरण आणि तिसऱ्या प्रसंगांतील ६० व्या-श्लोकाचा पहिला चरण हे एकच आहेत. तिसऱ्या चरणीं ' रूद्र वासरि हाच पाठ दोन्ही प्रतींत आहे. तो अपपाठ दिसतो. तो 'रुद्र यासरि' असावा. अर्थ रुद्राप्रमाणें भयंकर असा होईल, किंवा रुद्र ज्याप्रमाणें गिरिकंदरांत वसतो त्याप्रमाणें जे राजे गिरिकंदरांत लपले होते, असाहि अर्थ होईल.

श्लोक ३९ – आखरा = शवटास.

श्लोक ४० – दुसऱ्या पोथींत पहिल्या चरणानंतर पुढील चरण आहे. " रूपें आगळा चंद्रहास्या महीतें" आतां हा श्लोक पूर्ण झाला.

श्लोक ४३ – झणी दाखवीसी = दाखवूं नकोस. जुना प्रयोग.

श्लोक ४४ – सद्बुद्धि वैरागर = सद्बुद्धीची खाण.

श्लोक ४७ – चरण तिसरा–' मन ' च्या जागीं ' मज' हा पाठ आहे तो बरा.

श्लोक ५० – चरण पहिला–' पाहासी ' याचें वाचन वृत्तासाठीं ' पहसी ' असे करावें.

श्लोक ५१ – प्रत्येक चरणांत प्रारंभीं आलेल्या ' झणीं ' या शब्दाचा अर्थ ' नको ' असा आहे.

श्लोक ५२ – ३ रा चरण अर्थ–ज्या मध्यें सोन्याच्या काड्या आहेत अशीं वस्त्रें दे.

श्लोक ५६ – यांत सुंदर सुभाषित आहे.

श्लोक ५७ – दुसऱ्या पोथींतील पाठ ' तरि अरि प्रबळ यांतक दुसरा' असा आहे. तो योग्य होय. यावरून तो शब्द प्रळयांतक आहे.

श्लोक ५८ – विसरशीं या शब्दांचा अनुप्रास.

श्लोक ५९ – ' पत्रिका अपरंपार आहे. मनांत विचार कर. हे वीरा, भूत, भविष्य इ. गोष्टींचा विचार कर. पत्रिकेंतील अक्षरें भरून त्यांत अर्थ भर. आपल्या हिताचा शोध कर. हे भाग्यनिधे मनामध्यें मोह आणूं नकोस. ताबडतोब यास विष दे. ' असा भावार्थ.

श्लोक ४४ ते ६० – दुष्टबुद्धीनें मदनास पाठविलेलें पत्र

---

## प्रसंग पांचवा

**कथासूत्र** :–चंद्रहास्य एकटाच जाणार म्हणून त्याच्या आईस वाईट वाटलें. ती चिंताक्रांत झाली. प्रभु रक्षण करण्यास समर्थ आहे असें मातेस आश्वासन देऊन चंद्रहास्य पत्र घेऊन निघाला. कुंतलपुरासन्निध एका उपवनांत तो विसावला, सुंदर उपवनाची शोभा पाहून त्याचें मन आनंदलें. हात पाय धुऊन,प्रभूची पूजा करून तो एका वृक्षाखालीं झोंपला. त्याच वेळीं राजकन्या चंपक मालती, प्रधानकन्या विषया व इतर सख्यासह त्याच उपवनांत आली. वृक्षातलीं निद्रिस्त चंद्रहास्य पाहून सर्वांना विस्मय वाटला. परंतु विषया तर त्याच्यावर अनुरक्त झाली! सर्व तरुणींनीं जलक्रीडा केली. त्या नगरास परतल्या तेव्हां सख्यांना चुकवून विषया निद्रिस्त चंद्रहास्याजवळ आली. ती त्याचें रूप न्याहाळूं लागली, तों त्याच्या शेल्यांत तिला एक पत्र आढळलें. तिनें तें पत्र हळूंच उकललें आणि झाडाआड उभें राहून वाचलें.

श्लोक ३ – हें चंद्रहास्याचें भाषण आहे, पण रचना अतिशय शिथिल आहे

श्लोक ४ – मेधावती = चंद्रहास्याच्या आईचें नांव आहे. ओसावली = उद्विग्न झाली. आंसीं = अश्रूंनीं.

श्लोक ७ – दैवाची गति विचित्र असते. दैवगतीचाच हा खेळ आहे. या दैवगतीस कृपाळू श्रीहरिच आवरूं शकेल. हा भावार्थ.

श्लोक ९ – इंदु = चंद्रहास्य या अर्थी.

श्लोक १० – सुभाषित रूप आहे. चरण चौथा–मातापित्यांनीं त्यास आलिंगन दिलें. येथें कर्तें तृतीया विभक्तींत असावयास पाहिजेत. परंतु ते प्रथमेंत आहेत. हा सीमा प्रांतावरील 'रामा बाप मारला' याप्रमाणें प्रयोग आहे. वस्तुत: येथें विभक्ति तृतीयाच आहे पण प्रत्यय लाविला नाहीं असें समजावें. ही जुनीं रूपें होत.

श्लोक १२ – अंतराळा = आकाशांत, उंचावर. प्रथम चरण–दुसऱ्या पोथींत "पुरीबाह्य" असा पाठ आहे. तो योग्य.

श्लोक १४ – देवद्रुम = देवदार किंवा कल्पवृक्ष.

श्लोक १५ – वेणु = वेळूचे झाड. दुसऱ्या पोथींत तिसरा व चौथा चरण असे आहेत. "दिसली जसि चंद्रकला निवळे । वरुते शत रंग दुरंग निळे"

श्लोक १७ – यांत अनेक वृक्षांचीं नावें आहेत. चूत = आंबा, हिंगण = हिंगणबेट या नांवाचें एक झाड. दुसऱ्या पोथींत पहिल्या चरण असा "ताळ माळ तमाल नादुर व फापटि सिरनाटिका" यांत "व" अधिक आहे. चुकून राहिलेला शब्द "नादुर" आहे. नादुर = नांदुरखीचा वृक्ष.

श्लोक १८ – कुंजती = कुजती–कूजन करतात. धुसर = धुळीचें, धुरकट

श्लोक १९ व २० – नाना पक्षी अनेक प्रकारें नाचत, कूजन करीत होते हा भाव.

श्लोक २५ – सरस = तळें

श्लोक १२ ते २५ –कुंतलपुरांतील उपवनाचें वर्णन.

श्लोक २९ – डोळसा = सुंदरी (सुनयना).

श्लोक ३० – हेमअंगी = सुवर्णांगी ( संधि केला नाहीं ).

श्लोक ३२ – मुखरीण = मुख्या, दुसऱ्या पोथींतहि चवथा चरण नाहीं.

श्लोक ३३ – हेमकळा = सोन्यासारखी कांती असलेल्या. चेल = वस्त्र. या श्लोकांत ' यकीं ' तील ' य ' चा उच्चार ये-ए असा करावयाचा आहे. हें एके काळचें शिथिल लेखनोच्चाराचें सुंदर उदाहरण आहे. ह्या काव्यांत अशी शिथिलता फार आहे.

श्लोक ३४ – " कांहीं गौरीहरास चंदन चर्चीत होत्या, कांहीं वसंताच्या तिलकाप्रमाणें शोभणाऱ्या फुलांची लाखोली वाहात होत्या, कांहीं केशराचा सडा घालीत होत्या आणि कांहीं फणींद्र–तिलकास = हरास आणि योगिनीस म्हणजे गौरीस कस्तुरीनें भूषवीत होत्या.'

श्लोक ३८ – चरण २ रा 'प्रमान'च्या जागीं दुसऱ्या पोथींत 'मान' असा पाठ आहे, तो बरा. या श्लोकांत 'मान, सारंग, कल्याणराग. पंचमांग, सुरग' इत्यादि गायनांतील शब्द आहेत.

श्लोक ३९ – चरण ३ रा 'विराल्या' हा पाठ सरस.

श्लोक ४० – अंबुधि = समुद्र.

श्लोक ४२ – चरण ३ रा याचा अर्थ कित्येक स्वतनूस चिखल चोपडीत होत्या असा होतो. दुसऱ्या पोथींत हा चरण पुढीलप्रमाणें आहे 'किती लेपी पीणक करं तनुत ' वस्तुत: तो चरण 'किति लोपिति पीनकरें तनुतें' असा असावा किती आपल्या पुष्ट हस्तांनीं शरीर झांकीत होत्या, असा भावार्थ.

श्लोक ४३ – दुसऱ्या पोथींत 'सुता' असा पाठ आहे. सिंधुसुता = लक्ष्मी.

श्लोक ३३ ते ४३ – यांत त्या सुंदरींच्या क्रीडांचें वर्णन आहे.

श्लोक ४९ – स्वेद = घाम; कमळा = मुखकमळावर; प्रत्ययरहित रूप. त्याचप्रमाणें येथें 'मुख' शब्द अध्याहृत आहे. सरली = पुढें आली, प्राप्त झाली;

श्लोक ५० – सुरसे = पृथ्वीवर, भूमीवर

श्लोक ५१ – निरिबंद = निऱ्यांची गांठ

श्लोक ५२ – रळिया = थट्टा, विनोद;

श्लोक ५३ – चरण तिसरा व चौथा – राजाचें रूप तिच्या मनांत ठसलें होतें. त्या योगें तिला दुसरें कांहीं सुचेना. तिची शुद्धीच ह्या योगें उडाली होती हा भाव.

श्लोक ५४ – चरण तिसरा–'वसेल कीं दिसेल तो.' असा पाठ दुसऱ्या पोथींत आहे. अर्थ असमाधानकारक.

श्लोक ५७ – हाटकांगी – कांचनांगी = सुवर्णांगी.

श्लोक ६७ – विषयेला ह्या श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें चंद्रहास्य वाटला.

श्लोक ७० – दुसऱ्या पोथींत तिसरा चरण पुढीलप्रमाणें आहे. 'देखतांचि पातली कला कळेल व्यापका' हा पाठ योग्य आहे.

---

## प्रसंग सहावा

**कथासूत्र :–** चंद्रहास्याच्या जवळचें पत्र विषयेनें वाचलें. त्यांत लेखनप्रमादानें चूक राहिली असें तिला वाटलें. एवढा सुंदर कुमार, आणि त्याला विष द्या असें आपला पिता लिहील, हें तिला खरेंच वाटेना. अशा परिस्थितींत आपल्या भावाच्या हातीं हें पत्र पडलें तर तो खरोखरच ह्यास विष देईल. यास्तव विषया घाबरी झाली! आपल्यासाठीं बापानें हा राजबिंडा नवरा पाठविला याचा आनंद तिला झाला. परंतु पत्रांतील प्रमादामुळें त्याच्यावर येणाऱ्या संकटाचीहि तिला जाणीव झाली. तिनें आपल्या नेत्रांतील अंजन आपल्या बोटास लाविलें आणि 'विष यासी दिजे' या पंक्तींत 'या' वाढवून 'विषया' यासी दिजे' अशी सुधारणा करून ती निघून गेली. इकडे चंद्रहास्य जागा झाला. तो दुष्टबुद्धीच्या मंदिरास येईपर्यंत विषया विरहव्यथेनें व्याकूळ झाली. विषयेच्या भावानें पत्र हातीं पडतांच

पित्याच्या आज्ञेप्रमाणें लग्नाची सिद्धता केली. ज्यास विष मिळावयाचें त्यास विषया प्राप्त झाली!

श्लोक ९ – विप्रित = विपरीत.

श्लोक १२ – धीर्यता – धीरता = धैर्य.

श्लोक १७ – तिसरा चरण ' ते सूधले सुंदर अंगुळीतें" असा आहे. त्या सुंदरीनें तें आपल्या अंगुळीस लाविलें असा भाव.

श्लोक २५ – पहिला चरण 'त्वरें उटउ' हा दुसऱ्या पोथींतील पाठ.
दुसरा चरण 'नाव याचें' असा पाठ दुसऱ्या पोथींत आहे, तोच योग्य. कांता = पतीस कांता = पत्नी.

श्लोक २६ – 'हळफळ, गाटी, गट्टी' यांचे निश्चित अर्थ कळत नाहींत.
चरण चौथा–'तगबग मन ईच नोवरि फार खोटी.'
दुसऱ्या पोथींत असा पाठ आहे.

श्लोक ३१ – प्रयेंकीं–पर्यंकी = पलंगावर

श्लोक ३३ – तिसरा चरण – 'मनीं कुरंग रंगला' हा दुसरा पाठ.

श्लोक ४६ – चवथा चरण – झणि मना करुणा रूप साजनी' दुसऱ्या पोथींत असा पाठ आहे तो बरा दिसतो.

श्लोक ४७ – सद्य = तत्काळ

श्लोल ४८ – हिमकरवदना = चंद्रवदना; उडुपति = चंद्र, उडुपतिवहन = मृग, उडुपतिवहनाक्षी = मृगाक्षी.

श्लोक ५० – दुसऱ्या पोथींत या वृत्ताचें नांव 'चंद्रमालिनी' असें आहे.

श्लोक ५१ – दुसरा पाठ 'भाग्यवंतीं'

श्लोक ५३ – दुसरा चरण दुसऱ्या पोथींत 'बंधु आला' हा पाठ योग्य वाटतो. चवथा चरण 'न बोला' हा पाठ सरस. 'न केला' याचा अर्थ लागत नाहीं.

श्लोक ५४ – तिसरा चरण 'मी उमजून कां झोंपी जावें ?'

श्लोक ५५ – पहिला चरण दुसऱ्या पोथींत 'मनी' च्या जागीं 'मणी' असा पाठ आहे. अर्थावरून पाहतां तो 'म्हणी' असावा.

श्लोक ५७ – गोधूसर = गाईंच्या पायांची धूळ

श्लोक ६० – तिसरा चरण दुसरा पाठ 'बरा' आहे.

श्लोक ६२ – चवथा चरण 'सुमती'चे ठायीं संपतो' पाठ आहे; तो योग्य होय.

श्लोक ६३ – सीमांतपूजनाचें वर्णन.

श्लोक ६४ – यांत ओलें रुखवत आहे.

श्लोक ६९ – दुसरा चरण हें रागाचें नांव आहे. मागें प्रसंग ५ वा श्लोक ३८ वा चरण दुसरा टीप पहा.

श्लोक ७० – 'ऊठेल' पेक्षां 'सुठीलें' हा पाठ सरस. इंदुज्योति = चंद्रज्योति. नांवाचें भाषांतर

श्लोक ७२ – चवथा चरण दुसऱ्या पोथींत पुढीलप्रमाणें आहे. 'प्रताप पनक' कलोट चपटे' याचा अर्थ नीट लागत नाहीं.

श्लोक ७५ – अंबर = वस्त्र

श्लोक ७६ – मूद = भाताची मूद

श्लोक ७९ – चवथा चरण 'इंदु सूर्य मुनी ऋषी द्विजवरा दे आदरं मंगल' असा पाठ आहे.

श्लोक ८२ – पहिला चरण 'पद्मप्रती' या ठायीं दुसऱ्या पोथींत 'पटाप्रती' आहे तें योग्य. पट = अंतर्पट.

श्लोक ८३ – चवथा चरण दुसऱ्या पोथींत पुढीलप्रमाणें आहे 'विधान विधी सर्व मांगल्य वाचा'

श्लोक ८४ – पहिला चरण 'बिबला' या ठायीं दुसऱ्या प्रतींत 'बोउला असा पाठ आहे तो योग्य. बोउला = बोहला–बोहलें.

—•—

## प्रसंग सातवा

**कथासूत्र**:-आपल्या घरीं लग्न सोहळा चालला आहे याची दुष्टबुद्धीस कल्पनाहि नाहीं. कुळींद्रास बंदींत घालून प्रजेवर नानाविध अत्याचार करून आणि भरपूर संपत्ति व बंदीजन यांचा संग्रह करून दुष्टबुद्धि आपल्या नगरास आला वाटेंत त्यास एक सर्प भेटला. त्यानें विषया आणि चंद्रहास्य यांच्या लग्नाचें वृत्त त्यास कथिलें. प्रधान रागावला. पुढें ब्राह्मण भेटले. त्यांनींहि दुष्ट-बुद्धीस तेंच सांगितलें तेव्हां तो प्रधान रागावला. त्यानें सर्व ब्राह्मणांना दूतांकरवीं लुटले आणि ताडन केलें. घरीं आल्या वर, वैऱ्य चा समूळ उच्छेद करण्याची आज्ञा केली असतांना तूं हें काय केलेस ? असें त्यानें मदनास विचारिलें. मदनानें त्याचें पत्र त्यास दिलें. " त्यांत विषया द्या " असा स्पष्ट उल्लेख केला होता. प्रधानानें दैवाला बोल लाविला. पण वर-करणीं हें सारें दिसूं न देतां 'तुझ्या चातुर्याची मी परीक्षा पाहिली' असें सांगून निरोप देऊन त्यानें पुत्रास राजाकडे पाठ-विलें. प्रधानपुत्रानें राजास निरोप कळविला. आज साडे आहेत, यास्तव येण्याची कृपा करावी. राजा संतापला. आपली कन्या लग्नाची असतांना प्रधानानें गुपचूप स्वतःच्या कन्येचें लग्न लावलें, याचें त्याला वैषम्य वाटलें. वर मदनासारखा आहे असें सभाजनांनीं सांगतांच आपली कन्यकाहि त्यासच देण्याचें राजानें ठरविलें. राजानें वराला राजदरबारांत आणण्याची प्रधानपुत्रास आज्ञा केली.

श्लोक २ – विखार = सर्प

श्लोक १२ – काश्यास = कशाला. दोषाचर–रात्रिचर = चोर

श्लोक २२ – भूमिसागरा = भूमीवरील सागर–अर्थात उपरोधानें डबकें.
चवथा चरण – मतिहीना, कुमतीचें झाड, मूर्खपणाची खाण असा मदना, हा भावार्थ.

श्लोक २४ – तिसरा चरण – 'सची स्वभक्ति' यापेक्षां दुसऱ्या पोथींतील 'संनिध भक्ति' हा पाठ बरा.

श्लोक २६ – मदन :– तात, आपण द्रव्याच्या मोहांत व्यर्थ गुंतला आहां. आपण धाडलेली पत्रिका मजपाशीं आहे, यांत संदेह नाहीं. आपल्या आज्ञेप्रमाणें वागून मी सौख्यानंद प्राप्त करून घेतला. येथें दुसऱ्या पोथींतील दुसरा चरण घ्यावा. तो असा – 'असे पत्रिका यासि संदेह नाहीं'

श्लोक ३४ – अचळांग आंगीं = अस्ताचळाच्या पलीकडे, माळाच्या आड, तमांतक = सूर्य. तिसरा चरण – मंत्र्याचे मनोरथ मनांतच जिरले आणि तो स्वतः स्वगृहास गेला हा अर्थ.

श्लोक ३७ – तिसरा व चौथा चरण – मदन म्हणतो, राजा प्रधानानें अनेक प्रकारें करून तुला विनंति केली ती परीस. तिसऱ्या चरणांतील 'परी' हा शब्द 'परीस' आहे. पण तो दोन्ही पोथ्यांत 'परी' हाच दिला. 'परीस' हा शब्द घेतल्यास वृत्तदोष नाहींसा होतो. परीस = ऐक.

श्लोक ४१ – 'नव्हे' हा शब्द 'नव्ह' असा वाचावा. तेणें वृत्तदोष परिहरतो.

श्लोक ४३ – जंबुद्वीप आणि समुद्रवलयांकित पृथ्वी, जी छप्पन्न कोटी लोकांनीं आणि राजांनीं गजबजली आहे ती, अवघ्या अकरा दिवसांत यानें जिंकिली असा हा बळवान आहे.

श्लोक ४४ – दुसरा चरण – त्याच्या दया, धैर्य ह्या लक्षणांनीं त्याच्या ठायीं राजकला रंगून गेली हा भावर्थ घ्यावा. दुसऱ्या पोथींतील पाठ 'रंगली कला' असा आहे.

श्लोक ४७ – उपाधी = येथें कृति हा अर्थ घ्यावा.

श्लोक ४८ – निज तात = तात. येथें निज शब्द निरर्थक आहे. मध्य कालीन कवींत पुष्कळदां तो असा येतो.

श्लोक ५० – अर्थ. सोन्यासारखी सुंदर, तेजस्वी, कलायुक्त, चांफ्याची कळी अशी ती शोभते. तिला सुंदर, चांगला, श्रेष्ठ वर आण असें मी त्यास मनांतील गुज विश्वासपूर्वक सांगितलें. ह्या श्लोकांतील चवथा चरण – 'निज कथिलें दुरि टाकुनि शंका' ( दुसरी पोथी. )

श्लोक ५२ – चवथा चरण – खरोखर हा आपला म्हणण्या जोगा, सज्जन असा नसून दुष्ट दुर्बुद्धि आहे.

श्लोक ५३ – ह्यांतील तोटक वृत्तास एक गुरु जोडून हें वृत्त घडलें. पण चवथा चरण विषमरचनेचा आहे.

श्लोक ५५ – कुळवंताच्या कुळांत जन्मूनहि हा भूमीवर सत्यानाश करतो, मला देखील मोजीत नाहीं. लोकांना नकळत ( कपटानें) हा कामें करतो, अनीतीनें वागतो, सज्जनांस गणीत नाहीं. हा भाव. तिसरा चरण – 'करिजे रचना न कळोनि जना' असा पाठ दुसऱ्या पोथींत आहे.

श्लोक ६० – ह्यांत पहिला चरण बारा अक्षरी, भुजंगप्रयाताचा. पण ह्यांत 'ख' अक्षर गुरु मानवें लागतें. दुसरा, तिसरा चरण इंद्रवज्रा वृत्ताचा आणि चवथा चरण उपेन्द्र वज्रेचा आहे. असें तीन वृत्तांचें मिश्रण येथें आढळतें.

श्लोक ६७ – दुसऱ्या पोथींत चवथा चरण पुढीलप्रमाणें आहे. 'चौद प्रबंध प्रवीण परागी' अर्थ : छंद प्रबंध इत्यादिकांत प्रवीण.

श्लोक ६८ – 'नृपति विरराज म्हणे मदना । सवे सत्वर जाय सुखें सदना वरराजित भूप रिपू कदना । सवे सुंदर आणि शशीवदना' दुसऱ्या पोथींत वरीलप्रमाणें ह्या श्लोकांची रचना आहे.

श्लोक ६९ – तिसरा चरण – 'मनांत जर कपट धरशील तर' हा भावार्थ.

— o —

# प्रसंग आठवा

**कथासूत्र** :– दैवगति विचित्र असते हेंच खरें. दुष्टबुद्धीनें चंद्रहास्याला वधण्यासाठीं पुन्हां एक वार मोरकरी घातले. चंद्रहास्याला कुळपरंपरेप्रमाणें अंबालयांत एकटेंच जाण्याची सूचना त्यानें केली. त्या ठिकाणीं मारेकऱ्यांनीं त्याचा वध करावा असें दुष्टबुद्धीनें ठरविलें होतें. त्याप्रमाणें चंद्रहास्य पूजासाहित्य घेऊन निघाला. वाटेंत दुष्टबुद्धीचा पुत्र मदन चंद्रहास्यास भेटला. राजानें त्यास त्वरित बोलावलें आहे असा निरोप मदनानें त्यास कळविला. चंद्रहास्याच्या हातचें पूजासाहित्य घेऊन मदन अंबालयांत गेला. जो पूजासाहित्य घेऊन येईल त्यास वधावयाचें असें मारेकऱ्यांना सांगितलेलें असल्यामुळें चंद्रहास्याच्या जागीं दुष्टबुद्धिपुत्र मारला गेला. चंद्रहास्य मात्र राजाचा जांवई झाला. त्याचें राजकन्येशी थाटानें लग्न लागलें. राजाची कन्या आणि राज्य दोन्हींहि चंद्रहास्यास प्राप्त झालीं !

श्लोक ४ – चरण पहिला देव पूजे असा पदच्छेद करून देवालयांत जो कोणी देव पूजील, असा अर्थ करावा.

श्लोक ७ – महिमंडन = पृथ्वीचें भूषण

श्लोक ८ – दंडली = शोभली.

श्लोक १० – आमच्या कुळांत पहिल्यापासून चाल आहे कीं नवरदेवानें ह्या आदिमायेचें, अपरंपार शक्तिशालिनीचें पूजन करावें.

श्लोक १३ – गौरी = जगदंबा.

श्लोक १५ – दुसऱ्या पोथींत तिसरा आणि चवथा हे दोन चरण अनुक्रमें पुढीलप्रमाणें आहेत :–

'अंबिका पुजा आमृतालया
या सुखें प्रभू मंडपालया'
अमृतालया अंबिका = अमृताचें वसतिस्थान अशी जगदंबा

श्लोक १७ – दुसरा पाठ 'उदधी सभार' हा घ्यावा; अर्थ सेनासमुद्र.

श्लोक १८ – पहिला चरण पाठांतर 'पटांबरें' = महावस्त्रें

श्लोक १९ – चवथा चरण 'पूजनविधिस जातो आजि अंबा अरामा' हा पाठ बरा.

श्लोक २२ – विरपदीं = वीरपदी = पाईचे वीर

श्लोक २९ – दोर्दंडबंडे = बाहुबलानें.

श्लोक ३० – वागासन = दोन्ही पोथ्यांत हाच पाठ आहे. पण त्याचा अर्थ लागत नाहीं.तो शब्द 'नागासनीं' असावा.नागासनीं = हत्तीच्य अंबारींत.

श्लोक ३३ – चवथा चरण 'भुपवली सकुलि तुज कांपति' असा दुसरा पाठ आहे. तो बरा. अर्थ बलो (बळी) बळवान राजे सहपरिवार अथवा राजांचीं कुळें तुला कांपतात.

श्लोक ३४ – दुसऱ्या प्रतींत नाहीं. त्याचा अर्थ, तुझ्या प्रतापाच्या वडवानळानें पृथ्वीवरील राजमंडळें करपून गेलीं. त्यांचें शौर्य दग्ध झालें. तुझा कीर्तिसमुद्र चहूंकडे पसरला. तुझें सामर्थ्य इतकें मोठें कीं राजाचीं सैन्यें त्यापुढें फिकीं पडलीं.

श्लोक ३५ – हिलाल = चंद्र

श्लोक ३७ – मीनध्वज = मदन

श्लोक ४१ – 'वृंदानना' दुसरा पाठ 'वृंदावना' आहे. पण अर्थ लागत नाहीं.

श्लोक ४४ – दुसरा पाठ 'कर्पुरगोरा सुंदर गोरी । मांदारातलि शामलगोरी ॥

कीं पुजिली इन मंगळ गोरी । यास्तव हा वर निर्जळ गोरी ॥

दोन्ही पाठ समर्पक वाटत नाहींतः– कर्पुरगोरास ज्याप्रमाणें सुंदर गोरी शोभा देते, तशी ही ह्या वरास शोभते. हिनें मंगळागोरीचें पूजन केलें यास्तव हीस निर्जर–गोर म्हणजे देवासारखा गोरापान नवरा मिळाला.

श्लोक ४५ – अपर्णा–उमा-अंबिका = पार्वती

श्लोक ४६ – नाहो = नाथ, पति 'मानला' पाठांतर 'मानली', योग्य.

श्लोक ४७ – वदे = हेमावती वदे.

श्लोक ४९ – प्रवाळाधरा = प्रवाळाप्रमाणें जिचा खालचा ओंठ आहे ती.
क्षमापाळक = क्षमा = पृथ्वी, पृथ्वीचें पालन करणारा.
तिसरा चरण पाठांतर 'पती' = नोवरा योग्य.

श्लोक ५० – गणक = ज्योतिषी;

श्लोक ५१ – आज रविवासर असें हें संधि केलेलें रूप लक्षांत ठेवणें. चरण चवथा–'मातांग इंदु घटिका' ही वेळदर्शक रचना कूटात्मक आहे.

श्लोक ५३ – हीहि रचना कूटात्मकच आहे.

श्लोक ५५ – इंदुवगत्रा–इंदुवक्त्रा = चंद्रानना

श्लोक ५६ – असंबद्ध रचना.

श्लोक ६८ – चरण तिसरा मूळ पाठ 'विजना' असा आहे. तो मी '(क) विजना' असा केला. पण दुसऱ्या पोथींतहि 'वीजना' असाच पाठ आहे. तेव्हां (क) घेण्याचें कारण उरत नाहीं. अर्थ मात्र नीट लागत नाहीं.

श्लोक ६९ – पहिले दोन चरण-तो राजाच्या मंदिरांत गेला. तेथें त्याचें भोजन झालें. तिसरा चरण 'विराज नेत्रीं घेउनि रामा' याचा अर्थ लागत नाहीं. दुसऱ्या पोथींत तो पाठ 'वारिजनेत्री' असा आहे. अर्थ:– कमळासारखे नयन असलेल्या सुंदरीस घेऊन तो पुनश्च मंडपांत आला.

—०—

## प्रसंग नववा

**कथासूत्र** :– राजकन्येशीं विवाह झाल्यानंतर चंद्रहास्यानें घरीं जाण्याची इच्छा व्यक्त केली. राजानें त्याला समारंभपूर्वक राज्याभिषेक करण्याची सिद्धता केली. दुष्टबुद्धीनें आपल्या कन्येची पाठवणी केली. वराला घरीं बोलाविलें व मध्यंतरींचा वृत्तांत चंद्रहास्यास विचारला. चंद्रहास्याच्या कथनावरून आपलाच पुत्र मारला गेला हें त्याच्या लक्षांत आलें. तो अंबालयांत गेला. आपल्या पुत्राचें खंड विखंड झालेलें प्रेत त्यानें पाहिलें. लगेच शिळेवर डोकें आपटून त्यानें प्राण सोडला. इकडे राजकन्या व प्रधानकन्या यांच्यासह चंद्रहास्यास राज्याभिषेक करण्यांत आला.

श्लोक १ – 'रजनीकरहाय'– दुसऱ्या पोथींतील पाठ 'रजनीकरहास' असा आहे. याचा अर्थ चंद्रहास्य असा आहे. चंद्रहास्य राजास म्हणतो, हे राजा, विनंति ऐका,' आज तुमच्या प्रधानाच्या घरीं लग्नाचा तिसरा दिवस आहे, तेव्हां आपण तेथें येऊन कौतुक पाहा.

श्लोक ६ – भांडीं=तोफा, चरण ३ व ४ दारूचे नळे सुटले ते अग्नीचीं फुलें लागलेल्या झाडांप्रमाणें दिसूं लागले हा भावार्थ

श्लोक ७ – दामिनी तेज = विद्युल्लतेचें तेज;

श्लोक १४ – पयाब्धीसुता प्राप्त झाली – भुपाची = राजाची लक्ष्मी प्राप्त झाली.

श्लोक १७ – नागासनीं = हत्तीच्या अंबारींत; कोपना = कोपता (पाठ)

श्लोक १९ – मुखमंयक = मुखचंद्र;

श्लोक २१ – सुमानें = अत्यंत मानानें;

श्लोक ३८ – वयस्या = मैत्रीण

श्लोक ४१ – अमरालय = देवालय

श्लोक ४४ – चवथा चरण – "मदनजी निकटी किति थाटले" असा पाठ आहे.

श्लोक ४८ – तिसरा चरण – 'चितानिधी' हा पाठ सरस, वाड = पुष्कळ चवथा चरण – 'चोजके' च्या जागीं 'वोचके' पाठ आहे, तो सरस.

श्लोक ५४ – श्रोणित – शोणित = रक्त,

श्लोक ५८ – कौतंळाधीशकांतांबुजाक्षी. = कांता + अंबुजाक्षी = कमळासारखे नेत्र आहेत जिचे अशी ती राजपत्नी, कांता + अंबुजाक्षी यांचा संधि केला आहे. संमतें = समेत = बरोबर. वावने = सवनें ( गवाक्ष ). वावनें किंवा सवनें हें माळवदास असतें.

श्लोक ६४ – यांत गायनांतील पारिभाषिक शब्द आहेत.

---

## प्रसंग दहावा

**कथासूत्र** :– चंद्रहास्यास राज्याभिषेक झाला. इकडे दुसरे दिवशीं पुजारी अंबालयांत गेला असतां त्यास दुष्टबुद्धि व त्याचा पुत्र यांचीं प्रेतें देवीच्या देवळांत, रक्ताच्या थारोळ्यांत आढळून आलीं. पुजारी घाबरला त्यानें ही वार्ता राजास सांगितली. राज्याभिषेक झाला आणि दुसरेंच दिवशीं असा अपशकून झाला याची चंद्रहास्यास खंत वाटली. त्यानें मोठा यज्ञ केला. देवीची आराधना केली देवी प्रसन्न झाली. तिनें वर माग अशी आज्ञा केली. चंद्रहास्यानें वर मागितला, "प्रधान पितापुत्र जिवंत व्हावेत." दोघेहि जिवंत झाले. चंद्रहास्यानें दुष्टबुद्धिपुत्रास प्रधान नेमलें. चंद्रहास्याच्या मातापित्यांसहि बोलावण्यांत आलें. राजकन्या व प्रधानकन्या या दोघींसहि पुत्र झाले. बापाप्रमाणेंच तेहि बलाढ्य निघाले.

नारद म्हणतात, अर्जुना ह्याच चंद्रहास्याच्या पुत्रानें तुझा यज्ञीय अश्व अडविला आहे. "आपल्याला घोडा अडवावयाचा

नाहीं. या निमित्तानें कृष्णाचें दर्शन आपणांस घडेल हीच इच्छा आहे." असें आपल्या पुत्रास चंद्रहास्यानें सांगितलें. अर्जुनानें आपलें सैन्य सज्ज केलें. चंद्रहास्यहि लढण्यास सिद्ध झाला त्यानें कृष्णास पाहिलें, लगेच त्याचे चरणीं मस्तक ठेवलें. अर्जुनाचा अहंकार जागा झाला. गीतेंत सांगितलेला उपदेश मी विसरलों नाहीं असें म्हणत तो युद्धाचा विचार करूं लागला. श्रीकृष्ण म्हणाले, "अरे तुम्ही दोघेहि माझेच भक्त आहांत, भांडता कशाला? हे अर्जुना तू अहंकार सोडून चंद्रहास्यास आलिंगन दे." अर्जुनानें कृष्णाची आज्ञा मानली. दोघेहि भक्त मित्र बनले आणि सर्वांना आनंद झाला.

श्लोक १ – अंबू = पाणी

श्लोक ४ – गुरव = देवीचा पुजारी.

श्लोक १९ – विबुध = शहाणे (देव)

श्लोक २१ – देवीच्या पूजेसाठीं चंद्रहास्य सिद्धता करतो.

श्लोक २३ – जगत्रजननी–जगत्रय जननी = तिन्ही जगांची आई.
प्रथम चरण–पाठ 'स्वर्ग मंडळ'

श्लोक २८ – पंचमहाभूतें, सहा समुद्र, द्वीपें सरोवरें, सरिता शैल आदिसर्व तुझा जप करितात, यास्तव हे त्रिपुरे आज तूं कृपा कर.

श्लोक ३१ – त्याची अद्‌भुत अशी भक्ति पाहून जगदंबा प्रसन्न होऊन त्यास वर माग म्हणाली.

श्लोक ३२ – भाष = वाणी, उत्तर.

श्लोक ३३ – चवथा चरण–याचा पाठ 'धरि दयाकरि या सुरनायके' असा असावा. पण दोन्ही प्रतींत शब्द 'धिर' हाच आहे. याचा अर्थ 'हे सुरनायके देवी, यास तूं आपल्या दयारूपी करीं धर' असा आहे.

श्लोक ३७ – चवथा चरण–'लोक म्हणूं लागले हा चंद्रहास्य प्रभु धन्य आहे, पृथ्वीवर याच्या भक्तीनें अगदीं सीमा गाठली' असा भावार्थ.

श्लोक ३८ – मूळ पोथींत हा श्लोकच नाहीं. दुसऱ्या पोथींत तो पुढील-प्रमाणें आहे. 'भेटला मदनासि भूवर शोकसागर दाटला। तुंबला पुर नावरे निर्रसिधु लोचनिं लोटला॥'

'कोंदला हृदयांबुजीं भवधी भयार्णव आटला। पावला पर पार पावन पाप पादप तूटला॥

श्लोक ४२ – या वृत्ताचें नांव चुकून 'रथोद्धता' छापलें तें 'द्रुतविलंबित आहे.

श्लोक ४३ – तिसरा व चवथा चरण – 'आणवीली' 'संतोषवीली' असे अनुक्रमें पाठ आहेत, ते योग्य.

श्लोक ४७ – साहे = साह्य.

श्लोक ४८ – दुसऱ्या पोथींत तिसरा चरण. 'करी तूलसी पर्णपूजा तयेसी' असा आहे. चवथा चरण–'स्वयें होय' इ. मुळाप्रमाणेंच आहे.

श्लोक ५० – जे भक्त ब्राह्मणास शाळिग्राम अर्पण करतात आणि वर सोनें, मोतीं, वस्त्रें, गाई इ. दान देतात त्यांना द्विजांस त्रिभुवन दिल्याचें पुण्य लागतें. कोटयवधि तीर्थें केल्याचें श्रेय त्यांना प्राप्त होऊन त्यांचा जन्ममृत्यूचा फेरा चुकतो.

श्लोक ५१ – तिसरा व चवथा चरण–जो शाळिग्रामावरील गंधनिर्माल्य आपल्या शिरीं धारण करतो तो मुक्तिपंथास जातो. चवथा चरण – 'पाय'च्या जागीं 'जाय' हा पाठ सरस आहे.

श्लोक ४९ ते ५५ – पर्यंत शाळिग्रामपूजेचें महत्त्व वर्णिलें आहे.

श्लोक ५४ – शाळिग्रामास कोमल तुलसीदल वाहिल्यानें सर्व संसारबंधनें तुटतात. पिकून पिवळें झालेलें आणि गळून धरणीवर पडलेलें जरी तुळसीदल वाहिलें तरी त्यायोगेंहि पापाचे पर्वत भस्म होतात.

श्लोक ६० – जगत्तातताता = जगत्तात = ब्रह्मदेव. त्याच्या पित्यास विष्णूस.

श्लोक ६५ – भीष्मपर्वांत श्रीकृष्णांनीं अर्जुनास गीता सांगितली त्यास अनुलक्षून हें विधान आहे.

श्लोक ६६ – यांत 'तुखार' शब्द अश्व अशा अर्थीं वापरला. असाच तो ७८ आणि ८० च्या श्लोकींहि वापरला आहे. 'मागिला'च्या ठायीं 'बांधिला' हा दुसऱ्या पोथींतील पाठ योग्य आहे.

श्लोक ७० – अहंकृती– अहंकृति = अहंकार.

श्लोक ७७ – प्रथम चरण–'प्रभु जीतिले ते सर्वे भूपथाटों' हा दुसऱ्या पोथीं-तील पाठ चांगला आहे. तसेंच तिसऱ्या चरणीं 'पावलों' हा पाठ योग्य आहे.

श्लोक ८६ – दुसरा चरण, दुसऱ्या पोथींतील पाठ असा–'असे तो कवी विश्वनाथाभिधानी' यावरून कवीचें नांव विश्वनाथ असावें असें वाटतें.

दुसऱ्या पोथीविषयीं आणि प्रतलेखनाविषयीं:– हस्तअक्षर संताजी शामजी पतकी परगणे मनाटे ।। शके १६०–बहु-धान्यमाम संवत्सरे श्रावण वद्य अमवाशा समाप्ता ।।

सन हजरि अकरासे अडुसट ११६८ माहे जिलहेज ।।

—o—

## मराठवाडा साहित्य परिषदेचीं प्रकाशनें

**पुन्हा नभाच्या लाल कडा**

कै. बी. रघुनाथ यांचा कविता संग्रह

मूल्य : ३ रु.



**मोरोपंती आख्यानें**

संपादक – प्रा. भगवंत देशमुख

मूल्य : २ रु.



**तृणाची वेदना**

मराठवाड्यांतील नवोदित कथालेखक

तु. शं. कुळकर्णी

यांचा भावपूर्ण लघुकथा संग्रह

मूल्य : २॥ रु.